# कै. गुरुवर्य सोनोपंत दांडेकर यांचे चरित्र

## साधकांचा मायबाप

श्री. म. माटे



अनमोल प्रकाशन, पुणे २.

॥ श्री सद्गुरुनाथ मामा प्रसन्न ॥

बापरखुमादेवीवरु (विठ्ठल) हा विसंबे सर्वथा।

निवृत्तीने ठेवा सांगितले

हा आम्नाय आदेश व आचरण - साधना निरंतर

राहावी

आशीर्वाद पूर्वक भेट

<u>मो. गो. भावे</u>

मामांचा चरणरज

संपादक

शनिवार ता - २३/४/१९८८

वैशाख शु॥७ - मामांचा जयन्तीतिथी



# वै. गुरुवर्य सोनोपंत दांडेकर यांचे चरित्र

# साधकांचा मायबाप

मो. गो. भावे

मूल्य बारा रुपये



अनमोल प्रकाशन, पुणे २.

प्रकाशक :

मो. द. नांदुरकर
अनमोल प्रकाशन,
६८३, बुधवार पेठ,
पुणे ४११००२.

मुद्रक :

वि. ना. भंडारे
स्वानंद मुद्रणालय,
२०३ शनवार पेठ,
पुणे ४११०३०.

आवृत्ती : १९८८

# अनुक्रमणिका

१) जीवनपथ
२) निवेदन
३) संतस्तवन — ह. भ. प. धुंडामहाराज देगलूरकर
४) प्रास्ताविक
५) कुलसंस्कार व शिक्षण
६) जीवनकार्य
७) आदर्श वारकरी
८) गुरुवर्य मामांचे आचारविचार
९) ग्रंथसंपदा
१०) आजार व वैकुंठवास
११) साधन — भक्ति — सिद्धी
१२) असे होते मामा
१३) दीक्षा व मंत्रोपदेश
१४) वारी : पंढरीची नि आळंदीची
१५) आशीर्वाद आणि प्रसाद

## परिशिष्ट

पुरुषोत्तम दर्शन योग (भगवान ज्ञानेश्वर माऊली यांचे शब्दांत)
१ साधक — साधना   २ भक्ती   ३ दर्शन (साक्षात्कार)
(व्याख्याने टिपणी.)

# जीवन पथ

## सनावली

| | |
|---|---|
| २० एप्रिल १८९६ | जन्म, केळवे माहीम (जिल्हा–ठाणे) |
| १८९८ | मातेचा मृत्यू. |
| १९०१ | प्राथमिक शाळेत प्रवेश. |
| १९०३ | उपनयन |
| १९०५ | पुण्याला नूतन मराठी विद्यालयात प्रवेश. |
| १९०८ | विष्णुबुवा जोग यांचे सान्निध्यांत |
| १९१२ | मॅट्रिक उत्तीर्ण, फर्ग्युसन कॉलेजात प्रवेश, पित्याचा मृत्यू. |
| १९१३ | गुरुदेव प्रो. रा. द. रानडे यांचे सान्निध्य. |
| १९१७ | बी. ए. उत्तीर्ण. प्रल्हाद सीताराम शिष्यवृत्ती-तत्त्वज्ञान हा विषय. |
| १९१९ | एम. ए. उत्तीर्ण. 'प्लेटो'–विशेष अभ्यास. |
| १९२० | न्यू पूना कॉलेजांत तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर. शिक्षण प्रसारक मंडळीचे आजीव सदस्य. जोग महाराज यांचा वैकुंठवास. |
| १९२१ | तत्त्वज्ञान मंडळाची स्थापना. |
| १९३४ | नूतन मराठी विद्यालयाचे मुख्याध्यापक. |
| १९४० | रामनारायण रुइया कॉलेजचे उपप्राचार्य (माटुंगा) |
| १९४५ | सर परशुरामभाऊ कॉलेजचे प्राचार्य (पुणे) |
| १९४७ | "प्रसाद" मासिकाचे संपादक (य. गो. जोशी. व स. आ. जोगळेकर हे सहकारी) |
| १९५१ | शिक्षण प्रसारक मंडळीतून निवृत्ती. अखिल भारतीय तत्त्वज्ञान परिषदेचे अध्यक्ष. |
| १९५३ | सार्थ ज्ञानेश्वरीचे संपादन व प्रकाशन. |
| १९५७ | गुरुदेव रानडे यांचे निर्याण. |
| १९५९ | जिजी (भगिनी) यांचे निर्याण. |
| १९६० | ज्येष्ठ बंधू वि. वा. तथा बाबासाहेब यांचे निधन. |
| १९६३ | पहिला मोठा आजार. |
| १९६७ | स. प. कॉलेजचा सुवर्ण महोत्सव (सत्कार) |
| १९६८ | वै. जोगमहाराज यांचा जन्मशताब्दी उत्सव दुसरा मोठा आजार. |
| ९ जुलै १९६८ | पुणे येथे डॉ. वाय. व्ही. फाटक यांच्या रुग्णालयात वैकुंठवास. |
| १० जुलै १९६८ | अंत्ययात्रा व अंत्यसंस्कार (आळंदी–देवाची येथे) |

---

# निवेदन

गुरुवर्य वैकुंठवासी ह. भ. प. सोनोपंत महाराजांचे चरित्र संपून ते त्यांच्याच चरणी अर्पण करण्याचा सुयोग आला, याबद्दल मला अतिशय आनंद वाटतो. सर्व माउलींची आणि मामांची कृपा.

गु. मामा वैकुंठवासी झाले, तेव्हा पहिले काही महिने तर अत्यंत विमनस्क अवस्थेत गेले. या विचारांना हलके करावे म्हणून आपण मामांचे चरित्रच लिहावे असे मनात आले. तसे पाहिले तर गुरुवर्य मामा माझ्या जीवनात आले त्यावेळी त्यांचे वय ५०–५१ व माझे वय ४०–४१. तेथपर्यंत असे काही माझ्या जीवनात घडेल ही कल्पना नव्हती, पण पूर्व संचिताने घडले.

सहवास मात्र पुढे २०–२२ वर्षांचा. तोही दैनंदिन नव्हे; कारण दोघेही दोन शहरात राहात होतो. त्यामुळे पत्रव्यवहार हेच आम्हा गुरु-शिष्यामध्ये संपर्क साधण्याचे माध्यम होते. त्यांच्या पूर्व आयुष्याची अस्सल माहिती मजला नाही व आवश्यकताही वाटली नाही. हे चरित्र लिहिण्यातला माझा खरा हेतू गुरुवर्य मामा तर मला तसेच आपणा सर्व महाराष्ट्रीयांस पूज्य व प्रिय आहेत ते त्यांच्यातील गुणांमुळे. त्यांचा मागोवा घेणे हा माझा प्रधान हेतू आहे.

कारण तर उघडच आहे. मी एक सामान्य संसारी. माध्यमिक बिनपदवीधर शिक्षक. तेव्हा माझ्यातील उणिवा का प्रकट करणेस हव्यात. नको ! बरं त्यांचे दृष्टीने व माझेही मते मी अगदीच पामर. पण काय किमया, माझे आजचे कृतार्थ जीवन ज्यांच्या कृपाशीर्वादाने घडून आले त्यात माझा वाटा किती व श्रेय किती ? तर अत्यंत अल्प. पण सर्व सर्व गुण मामांचेच. त्यांनी माझे हित कशात हे जाणले. अत्यंत कणव ठेवून त्यांनी माझे कौतुक केले. कित्येक वेळेला झणझणीत वाक्प्रहार केले. पत्रद्वारा अंजन घालून अंतर्मुख केले. आत्मपरीक्षण करावयास लावले. माझ्यातील दोषांचे – चुकांचे प्रांजल दर्शन मला घडविले व परिमार्जनही केले.

त्यांचे चरित्रलेखन मला जमेल का ? तुकोबारायांच्या अभंगाचा लगेच विचार करता संतांचा महिमा फार दुर्गम असतो, ही जाणीव झाली. तेव्हा मामांचे यथार्थ दर्शन या सेवेत आहे असा माझा दावा नाही. उलट त्यांचा चरित्रभाग काहीसा कमी पण त्यांचा व माझा परिचय – जो सहवास त्या भागाचे शब्दांकन तर अधिक नाही ना असाही विचार संकोचाने भेडसावीत आहे.

गुरुवर्य मामा आता अनंतात, आपल्यात नाहीत. पण साधक वा जिज्ञासू त्यांचेकडे शरण गेला आणि त्यांचे जवळील जीवन–मुक्तपणाचे दर्शन त्याला कसे लाभले यापेक्षा आपले ठायी त्याची अनुभूती व्हावी या जिज्ञासेने गेला तर कसे कसे टप्पाटप्प्याने दर्शन करून देतात याचे शब्दांकन करण्याचा यत्न केला. परिहारवजा– म्हणजे चरित्रात हा भाग नसला तरी चालले असते असे आहे.

माणसाला मोठे व्हावे असे वाटत असते व त्याचा तसा प्रयत्नही असतो पण खरे मोठेपण उपासनेत आहे. पारमार्थिक उद्‌बोधनाची आवश्यकता आहे. आणि म्हणून आपण देव पाहावा, भेटावा तर कोणत्या रस्त्यावरून गेले असता पोचू याकरिताच ही प्रकरणे शब्दांकित करून समाविष्ट करीत आहे.

नाथांचा गावबा तसा मामांचा मी—आणि त्याचे प्रकट स्वरूप "पुरुषोत्तम दर्शन योग" अभ्यासपूर्वक तयार केलेला व्याख्यानांचा विषय (पुणे विद्यापीठ बहि:शाल व्याख्यानमालेकरिता) शक्यतो मर्यादा पालन करून, माउलींच्या अभंग गाथेतून त्यांचे दर्शन व्हावे साध्य.

चरित्र तर लिहून झाले. पण मग अनंत अडचणी प्रकाशनाच्या ध्यानी येऊ लागल्या. तसे पाहिले तर नाद टाकून दिला. पण मनोरथ तर उच्च ! मनोरथाला मर्यादा नसतात हे तर खरेच पण साध्य उच्च असले तर तेही सफल होऊ शकतात आणि त्याप्रमाणे आज घडत आहे.

## ॠणनिर्देश

आता या चरित्रलेखनात माझा स्वार्थ आहेच. जग याचे स्वागत कसे करील यापेक्षा या चरित्रलेखनाच्या निमित्ताने मामांच्या जीवनाचे चिंतन आणि उच्चार होईल, या विश्वासाने इतक्या उशिरा का होईना हे चरित्र प्रकाशित करण्याचा हेतू आहे.

हे निवेदन संपविताना वाचकांना पुढील सूचना देणे आवश्यक वाटते. गुरुवर्यांच्या चरित्रास "साधकांचा मायबाप" सोनोपंत दांडेकर असे नाव दिले आहे. कारण उघडच आहे. गुरुवर्य मला साधकाला मायबापच होते. आणि चरित्रात गुरुवर्य सोनोपंत दांडेकर यांचा उल्लेख "मामा" असाच केला आहे. वारकरी मंडळींना जरी ते सोनोपंत दांडेकर म्हणून परिचित होते पण पूसतपास करताना 'मामांचे कीर्तन कोठे आहे ?' असेच लोक विचारीत आणि म्हणून चरित्रात बहुतेक ठिकाणी "मामाच" संबोधिले आहे.

ही गंगावतीची, निरगुडीची पाने, ही वाक्‌पुष्पांजलि मी अतिशय श्रद्धापूर्वक श्रीगुरुचरणी अर्पित आहे. ही सेवा देवभक्तांनी मान्य करून घेऊन त्यांनी मला आपला म्हणावे, हीच प्रार्थना.

भरोनि सद्‌भावाची अंजुळी ।
मियां वोंविया फुलें मोकळी ।
अर्पिली अंघ्रियुगुली ।
विश्वरूपाच्या ॥ १ ।। ७०८/अ. ११

मी शुद्ध भावनारूप ओंजळींत ओव्यारूपी मोकळी फुले भरून विश्वरूपाच्या दोन्ही पायांवर अर्पण केली, असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात त्यासारखी.

## प्रार्थना

स्वानंद सुखनिवासी सद्‌गुरु सोनोपंत महाराज यांचे चरणी.

ब्रह्मानन्दं परमसुखदं केवलं ज्ञान मूर्तिम् ।
द्वंद्वातीतं गगन सदृशं तत्त्वमस्यादिलक्ष्यम् ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वश्री साक्षिभूतम् ।
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ १ ॥

**अर्थ :** ब्रह्मानन्दं- (आनंदस्वरूपी) इन्द्रियातील सुख देणारे, केवळ ज्ञानस्वरूपी, सुखदुःखादी द्वंद्वाच्या पलीकडील, आकाशाप्रमाणे अमर्याद, "तत्त्वमसि" इत्यादी उपनिषद वाक्याने वर्णिलेले, अद्वितीय त्रिकालातील, शुद्ध, ब्रह्मस्वरूपी, सर्वांच्या बुद्धीला साक्षीरूपाने असणाऱ्या अवस्थातील सत्वादिगुणांचे पलीकडे गेलेल्या अशा सद्गुरूंना (मामांना) मी नमस्कार करितो.

माझे शरीर, माझी इंद्रिये आणि माझे सामर्थ्यं वृद्धी पावोत व ईश्वर ब्रह्माला जाणून घेण्याइतकी कार्यक्षम बनोत. ईश्वराचे दर्शन व्हावे यासाठी साधना, तप, नामस्मरण करण्याची प्रवृत्ती त्यांना होवो. सच्चिदानंद परब्रह्म त्या विषयाचे प्रेम (भावना) माझ्या मनांत निरंतर असो. ब्रह्मस्वरूपाचा तिरस्कार मजकडून न होवो. परब्रह्मस्वरूपांत रत व्हावे ही उपजलेली माझी भावना तुझ्या कृपेने सफल होवो. सदाचारशीलसंपन्न माझे आचरण (वर्तन) राहो.

आतां हृदय हे आपुले । चौफाळूनिया भले ।
वरी बैसवू पाऊले । श्री गुरुची ॥ १ ॥

आता आपले शुद्ध अंतःकरण चौरंग करून त्यावर श्रीगुरूंच्या पावलांची (चरणाची) स्थापना करू.

मामा, आपली कृपादृष्टी व वर-प्रसाद मिळावा व जगणे ईश्वरावर सोपवून अगदी समाधान चित्त (शान्तात्मा) जीवन जावे असे व्हावे ही श्रद्धा. हे प्रसाद-दान आपण द्यावे.

## आभार

वारकरी संप्रदायाचे धुरीण पूज्य श्री धुंडामहाराज देगलूरकर यांनी प्रकृती बरी नसताही वै. सोनोपंतांविषयीच्या आपुलकीमुळे पुस्तकाला आशीर्वादरूप प्रस्तावना लिहून पाठविली, त्याबद्दल त्यांना कृतज्ञतापूर्वक अभिवादन करतो.

माझ्या हातून हे छोटेसे पुस्तक लिहून झाले त्याची मुद्रणप्रत तयार करण्यात श्री. म. श्री. दीक्षित आणि ते प्रकाशात आणण्यासाठी डॉ. मु. श्री. कानडे यांचे सहकार्य लाभले. आजच्या महर्गतेच्या काळात अनमोल प्रकाशनचे श्री. नांदुरकर बंधू यांनी पुस्तक प्रकाशनाची जबाबदारी घेतली. त्याचप्रमाणे स्वानंद मुद्रणालय, पुणे यांचे चालक श्री. वि. ना. भंडारे व त्यांचे सहकारी यांनी अल्पावधीत सुबक मुद्रण करून दिले. वरील सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतो.

मो. गो. साठे

॥ श्रीपांडुरंग प्रसन्न ॥

# संतस्तवन

विपायें जरी आठवले चित्ता । तरी दे आपुली योग्यता ।

हें असो तयातें प्रशंसितां । लाभु आथि ॥ ज्ञा. ६.१०४

श्री. ह. भ. प. शं. वा. तथा सोनोपंत दांडेकर हे एक तेजस्वी व्यक्तिमत्व महाराष्ट्राच्या भूमीवर होऊन गेले त्याला फार दिवस झाले नाहीत. तरीही बघताबघता अठरा वर्षे होऊ गेली. पण जे त्यांच्या संपर्कात आले त्यांच्या अंतःकरणात त्यांची स्मृती सदैव ताजी राहील. ज्यांनी त्यांच्या गंभीर ओजस्वी भाषेतील कीर्तने–प्रवचने ऐकली त्यांच्या केवळ कानातच नव्हे तर हृदयात त्यांचे शब्द आजही घुमत असतील. 'मामा' या आपुलकीच्या नावाने सगळा वारकरी समाज त्यांना ओळखत असे.

आमचा आणि त्यांचा स्नेह तर इतरांना हेवा वाटावा असा होता आणि काही लोकांना तो वाटतही असे. कारण श्री. वै. सोनोपंत हे लोकांना आपल्या फार जवळ येऊ देत नसत. स्वतःचे आचरण अत्यंत शुद्ध, विचार स्पष्ट, बोलणे रोखठोक व वृत्ती अलिप्त असल्यामुळे ते कुणाचीही भीडभाड ठेवीत नसत. त्यामुळे सामान्यपणे असातसा माणूस कितीही मोठा असला तरी त्यांना भिऊन त्यांच्यापासून दूर राहात असे. त्यांना माणसाच्या स्वभावाचे उत्तम ज्ञान असल्यामुळे ते त्याची लगेच पारख करीत. 'तुका म्हणे मज कळते चाचणी' असे असल्यामुळे ते लगेच त्या व्यक्तीला त्याची जागा दाखवून देत. पण ते असे कठोर वाटत असले तरी त्यांनी कधी कुणाचा राग धरला नाही. व्यक्तीची अडचण खरी असेल तर स्वतः उठून प्रयत्न करून, त्याला साहाय्य करीत. आपले मोठेपण बाजूला ठेवून त्याच्यासाठी इतरांकडे जाऊन शब्द खर्च करीत. इतके ते मृदू आणि उदार होते. आपल्या देहाकडे न पाहता व कशाचीही अपेक्षा न करता आपल्या कीर्तन–प्रवचनांच्याद्वारे संतांच्या विचारांचा प्रसार सुशिक्षित–अशिक्षित समाजात त्यांनी जो केला तो पाहाता 'देह कष्टवितीं परउपकारें' हे संतलक्षण त्यांच्या ठायीं मूर्तिमंत होते. त्यांच्या कार्याचे वर्णन किती करणार ? ते सर्वज्ञात आहे. आणि करावयाचे म्हटले तर वेगळा ग्रंथ होईल ! पू. श्री. वै. सोनोपंतांची जी चरित्रे लिहिली गेली आहेत ती अत्यंत त्रोटक आहेत. त्याचे एक कारण त्यांच्या कार्याचे स्वरूप हे अत्यंत व्यापक असल्यामुळे ते विशिष्ट पृष्ठसंख्येत आणणे हे कठीण काम आहे, आणि संतांचा महिमा 'वाचाळपणे' सांगताही येत नाही.

श्री. मो. गो. भावे यांनी लिहिलेले 'साधकाचा मायबाप' हे चरित्रही असे शब्दांनी लहान पण भावनेने ओतप्रोत आहे. 'आत्मीयता' हा या चरित्राचा विशेष आहे. कारण श्री. भावे यांनी त्यांचा आणि पू. श्री. सोनोपंतांचा ज्या प्रसंगात संबंध आला त्यांच्या आधारेच मुख्यतः हे चरित्र लिहिले आहे. त्यांना प्रत्यक्ष आलेल्या अनुभवातून त्यांना वै. मामांचे जे मोठेपण जाणवले व स्वतःच्या जीवनात त्यांच्यामुळे जो बदल झाला त्याचे वर्णन त्यांनी जिव्हाळयाने केले आहे व त्या जिव्हाळयामुळेच ते वाचनीय झाले आहे. पू. श्री. सोनोपंतांच्या स्वभावाची बहुतेक वैशिष्टये या छोटया चरित्रात प्रकट झाली आहेत व त्यातून त्यांचे मोठेपण प्रत्ययाला येते. संतांच्या मोठेपणाचे दर्शन हे आपल्या मोठेपणाला प्रेरक असल्यामुळे ते सर्वांनी घ्यावे !

श्रीक्षेत्र पंढरपूर,
भाद्रपद शु. ६, शके १९०९

धुंडामहाराज देगलूरकर

# प्रा स्ता वि क

पवित्र होईन चरित्र उच्चारें । तुकाराम महाराज–

वैकुंठवासी गुरुवर्य ह. भ. प. सोनोपंत दांडेकरमहाराज यांचे चरित्र यथामती लिहून ते त्यांच्याच चरणी अर्पण करण्याचा सुयोग आला याबद्दल मला निरतिशय समाधान वाटत आहे. ही सर्व स्वानंद सुखनिवासी गुरुवर्य सोनोपंत मामांची अपार कृपा.

मामा वैकुंठवासी होऊन ८–९ वर्षांचा काळ झाला आहे. या अवधीत "एक ज्ञानयोगी" (स. कृ. देवधर), "प्रा. सोनोपंत दांडेकर" (रा. गो. पाटील) व "ह. भ. प. प्रा. सोनोपंत दांडेकर यांचे चरित्र" (स. के. नेऊरगांवकर) यांनी चरित्रे लिहून आपापला सेवाभाव व्यक्त केला आहे. "प्रसाद" मासिकाने तर नोव्हेंबर १९६८ चा अंक 'श्रद्धांजली' अंक म्हणूनच प्रसिद्ध केला. या सर्व साहित्याचा मला उपयोग झाला. माहितीच्या दृष्टीने मी काही विशेष नवी भर घालीत आहे असे नाही. तथापि सोनोपंतांचा मला जो काही सहवास घडला त्याची शिदोरी पाठीशी बांधून मी हे चरित्र लिहिले असून त्यात मला घडलेले सोनोपंतांचे दर्शन प्रतिबिंबित केले आहे.

गुरुवर्य मामा यांचे गुरू वैकुंठवासी जोगमहाराज. त्यांचाच वारसा मामांनी पुढे चालविला. मामांनी अनेक ग्रंथ लिहिले. पण स्वतःचे चरित्र लिहिण्याची त्यांना कधी इच्छा झाली नाही. उलट, 'माझे कलेवर जेथे दहन केले जाईल त्या जागेवर अश्वत्थ (पिंपळ) वृक्षाचे रोपण करावे, समाधी वगैरे बांधू नये' अशी इच्छा त्यांनी अखेरच्या आजारपणात सूचित केली होती.

गुरुवर्य मामांचा नि माझा सहवास वीस-बावीस वर्षांचा. फार निकटचा असे म्हणता येणार नाही. प्रसंगाप्रसंगाने त्यांच्या माझ्या गाठीभेटी अनेकदा झाल्या. त्यांच्या चरित्रासंबंधी काही माहिती

मिळवावी असा यत्न मी त्या काळात केला नाही. क्वचित काही विचारावे असे मनात येई. पण गुरुवर्य मामा रागावतील या भीतीने विचारले नाही. मामा संतकोटीतील पुरुष होते. त्यांचा दास होण्याची माझी पात्रता नाही. त्यांचा मी शिष्य आहे यावर त्यांची निकटची मंडळी सहजासहजी विश्वास ठेवणार नाहीत. मी स्वतःला सोनोपंतांचा अनामिक शिष्य म्हणवितो, आणि म्हणूनच विनम्र भावाने त्यांचे मला घडलेले दर्शन मी या चरित्रात उमटविण्याचा यत्न केला आहे. या चरित्राच्या निमित्ताने गुरुवर्यांचा पुनरपि सहवास घडला हा आनंद माझ्या दृष्टीने आगळा आहे. या चरित्राच्या निमित्ताने मी माझे सांसारिक व पारमार्थिक जीवनही थोडे रेखाटण्याचा यत्न केला आहे. अर्थात गुरुवर्य सोनोपंत यांच्या जीवन चित्रणाच्या संदर्भात. ही माझी साधी स्मृतिपुष्पे वाचक गोड मानून घेतील अशी प्रार्थना (आशा) करतो.



# कुलसंस्कार व शिक्षण

**पवित्र ते कूळ, पावन तो देश।**
**जेथे हरिचे दास जन्म घेती ।।**

दांडेकर घराणे मूळचे रत्नागिरी जिल्ह्यातले. दांडे–आढुंब या गावी त्यांचें पूर्वज राहात असल्यामुळे, त्यांनी आपले पोंक्षे हे आडनाव टाकून दांडेकर धारण केले अशी आख्यायिका सांगतात. एकोणिसाव्या शतकात हे दांडेकर घराणे ठाणे जिल्ह्यातील केळवे माहीम गावी स्थलांतरित झाले. हा गाव समुद्रकाठी असून निसर्गरम्य आहे. एकेकाळी व्यापारासाठी हा गाव प्रसिद्ध होता. दांडेकर घराणे येथे राहू लागल्या-पासून थोडी शेती सावकारी करू लागले. हळूहळू या व्यवसायात चांगले बस्तान बसून घराणे सुखवस्तू समजण्यात येऊ लागले. या घराण्याचे आणखी एक वैशिष्टच म्हणजे ते धार्मिक, परोपकारी व आतिथ्यशील होते. पूजा-अर्चा, वैश्वदेव, कुलाचार अतिथि-सत्कार इत्यादी धार्मिक संस्कार घरी नित्य चालत.

अशा या पवित्र कुलात लक्ष्मीबाई आणि वामनराव दांडेकर या माता–पित्यांच्या पोटी वैशाख शु० ७ शके १८१८ सोमवार या दिवशी (दि. २० एप्रिल १८९६) दुपारी दोन वाजून पंधरा मिनिटांनी (दु. २–१५) एक सोन्यासारखा मुलगा निपजला. त्याचे पाळण्यातले नाव होते शंकर, पण पुढें सर्वजण सोनू, सोन्या या लाडक्या नावाने त्याला हाका मारू लागले. मोठेपणी सर्वत्र सोनोपंत हे नाव रूढ झाले.

सोनोपंतांचे वडील वामनराव ऊर्फ भाऊसाहेब हे केळवे माहिमात प्रतिष्ठित गृहस्थ होते. संसार सांभाळून सार्वजनिक कार्याकडेही ते लक्ष पुरवीत असत. स्थानिक नगरपालिकेचे ते एकदा उपाध्यक्ष होतें. त्यांना ज्या क्रमाने मुले झाली ती येणेप्रमाणे– (१) काशीबाई ऊर्फ जिजी– विवाह भिवंडीचे विश्वनाथपंत कर्वे यांच्याशी–पण तरुणपणीच वैधव्य

योग आला. त्यांना रामचंद्रपंत ऊर्फ भाऊसाहेब आणि लक्ष्मणराव ऊर्फ अप्पासाहेब असे दोन मुलगे होते. ही मायलेकरं आपल्या वडिलांकडेच राहात. (२) दुर्गाबाई, (३) यमुना. या तीन मुली पाठोपाठ झाल्यामुळे माता-पित्यांस थोडी उद्विग्नता आली होती. पण ईश्वरकृपेने चौथ्या खेपेस पुत्ररत्न झाले. त्याचे नाव विष्णू असे ठेवण्यात आले. विष्णू ऊर्फ बाबूराव (बाबा) दांडेकर वकील हे सोनोपंतांचे वडील बंधू. यांच्या पाठीवर पुन्हा मुलगी झाली तिचे नाव गंगूताई ऊर्फ अक्का. लक्ष्मी-बाईंचे शेवटचे अपत्य म्हणजे सोनोपंत. या सोन्यासारख्या मुलाला जन्म देऊन ती माऊली पुढे दीड एक वर्षच जगली. मातेची जागा मथुताई कार्लेकर यांनी घेतली.



# सोनोपंतांची जन्मलग्न कुंडली

॥ श्री ॥




॥ शुभं भवतु ॥

वासिष्ठ गोत्र. पुष्य नक्षत्र. प्रथम चरण.

दांडेकर कुटुंबावर श्री आणि लक्ष्मीचा वरदहस्त होता.

रामायण, महाभारत, गीता, भागवत इत्यादी धर्मग्रंथांचे घरात वाचनपठण होत असे. शास्त्रीपुराणिकांचा नित्य राबता असे. त्यामुळे धार्मिक संस्कारांचे बाळकडू सोनूमामांना आपोआपच मिळत गेलें. मामांचा व्रतबंध (मुंज) केळवे माहीम येथेच झाला. संध्या, वैश्वदेव, पुरुषसूक्त, श्रीगणपती अथर्वशीर्ष इत्यादी त्यांनी सहजगत्या मुखोद्गत केली. यानंतर मामांचे प्राथमिक शिक्षण सुरू झाले. मराठी शाळेत त्यांचा क्रमांक वरचा असे. चौथीच्या पुढे केळवे माहीमला शिक्षणाची सोय नव्हती. भाऊसाहेबांनी मग मुलांच्या शिक्षणाची सोय पुण्याला केली. पुणें हे विद्येचे माहेरघर असल्यामुळे मुंबईपेक्षा त्यांनी पुणे पसंत केलं. थोरली मुलगी जिजी बिऱ्हाड करून सोहोनींच्या वाड्यात राहात होती. सोनोपंत जिजीच्या मायेच्या सावलीत विद्येची आराधना करू लागले.

सन १९०५ साली पुण्याच्या विख्यात अशा नूतन मराठी विद्यालयात सोनोपंतांनी इंग्रजी शिक्षणासाठी प्रवेश घेतला. शिक्षण प्रसारक मंडळाने चालविलेल्या या संस्थेशी त्यांचा जो संबंध जडला तो मोठा भाग्यकारक ठरला. नामांकित ध्येयवादी शिक्षकांच्या सहवासात सोनोपंतांनी चांगली प्रगती केली. गुणवत्तेत त्यांचा क्रम नेहमी वर असे. त्यांचे मावसबंधू माधवराव देशमुख यांची तर त्यांच्यावर एखाद्या पालकासारखी पाखर होती. इंग्रजी व संस्कृत विषयांत माधवरावांचा सोनोपंतांना फार उपयोग झाला. १९१२ साली या शाळेतून मामा मॅट्रिकची परीक्षा पहिल्या वर्गात उत्तीर्ण झाले.

यानंतर उच्च शिक्षणासाठी मामांनी फर्ग्युसन कॉलेजची पायरी धरली. १९१७ साली ते बी. ए. ची परीक्षा हायर द्वितीय श्रेणीमध्ये उत्तीर्ण झाले. बी. ए. साठी तत्त्वज्ञान हा विषय त्यांनी घेतला होता. या विषयाला ठेवलेली 'प्रल्हाद सीताराम' ही स्कॉलरशिपही त्यांनीं मिळवली. फर्ग्युसन कॉलेजमध्ये आल्यापासून मामांच्या जीवनावर ज्या दोन महान व्यक्तींचा प्रभाव पडला त्या म्हणजे ह. भ. प. परमपूज्य विष्णुबुवा जोग आणि तत्त्वज्ञान विषयाचे प्राध्यापक गुरुदेव रा. द. रानडे. या दोघांच्या निकट सहवासामुळे आणि कृपेमुळे मामांची पावले परमार्थाकडे वाटचाल करू लागली.

'प्रल्हाद सीताराम' स्कॉलरशिप मिळालेल्या विद्यार्थ्यास दोन वर्षांच्या आत एम. ए. साठी ठेवलेले "तेलंग गोल्ड मेडल" मिळविण्याची इच्छा होती. पण ते मिळवावयाचे तर सन १९२० पर्यंत थांबणे प्राप्त झाले. मधल्या काळात मामा तत्त्वज्ञानाचा अभ्यास करीत होते. गुरुदेव रानडे यांच्या सांगण्यावरून ते एम. ए. परीक्षेला थोडचा नाखुषीनेच बसले. अभ्यास जेमतेम उत्तीर्ण होण्यापर्यंत झाला होता. पण प्रत्यक्ष परीक्षेचे वेळी त्यांनी उत्तर पत्रिका उत्कृष्टरीत्या लिहिल्या आणि १९१९ साली ते एम. ए. परीक्षा उत्तीर्ण झाले. मामा यावेळी आळंदीला होते. त्यांचे मित्र डॉ. घारपुरे यांनी त्यांना जी तार पाठविली ती अशी–

"Sorry, you are declared pass"

'एम. ए. झालात पण तेलंग मेडल हुकले' असा या तारेचा आशय होता. ती तार वाचून मामांचे मन काहीसे खट्टू, तर काहीसे आनंदित झाले. एम. ए. झाल्यानंतर मामा काय करतात इकडे सर्वांचे लक्ष होतें. पालघरला त्यांचें वडिलार्जित घर व व्यवसाय होता. वडिलांचे छत्र कोसळून पडले होते. वडील बंधू बाबा घरी होतें. भावाभावांतील प्रेम अगदी रामलक्ष्मणासारखे होते. मामांना घराची, संसाराची ओढ कधी लागलीच नव्हती. संसाराचा सर्व भार त्यांनी स्वखुषीने वडील बंधूंवर सोपविला आणि ते आपल्या मार्गाला लागले. हा मार्ग म्हणजे विद्यादान आणि परमार्थ. जोगमहाराजांचे बोट धरून तरुणपणीच जो मार्ग स्वीकारला त्या मार्गावरून जाणे हाच त्यांनी पुरुषार्थ मानिला.



# जीवन कार्य

एम. ए. पदवी उत्तीर्ण झाल्यानंतर मामांना विद्यादानाची संधी विनासायास चालून आली. न्यू पूना कॉलेजचे प्राचार्य विनायकराव आपटे यांनी गुरुदेव रानडे यांचे मार्फत मामांना भेटीस बोलाविले व कॉलेजात येण्याची विनंती केली. जुलै १९१९ पासून ते कॉलेजमध्ये शिकवू लागले. पुढल्याच वर्षी ते शिक्षण प्रसारक मंडळाचे आजीव सेवक झाले. आपल्या या नोकरीविषयी मामांनी जोगमहाराजांच्या चरित्रात (प्रकरण १८, पृ. ८८) पुढील उल्लेख केला आहे :

"माझ्यासंबंधी मी (मामा) लिहावे असे काही नाही. एका गोष्टीचा मात्र उल्लेख केला पाहिजे तो असा की, मी नोकरीच्या पाशात गुंतू नये अशी बोवांची इच्छा होती. पण कौटुंबिक परिस्थितीमुळे मला नोकरी करावी लागली. त्यातल्या त्यात भले इतकेच की मी सरकारी नोकरी केली नाही. जी केली ती शिक्षण क्षेत्रात."

मामा हे जोगमहाराज यांचे शिष्य आणि वारकरी सांप्रदायाचे प्रचारक आहेत ही गोष्ट शिक्षण प्रसारक मंडळाला माहीत होती. नोकरी पत्करताना मामांनी आपले धर्माचरणाचे स्वातंत्र्य अबाधित ठेवले होते. 'वारीला मला रजा मिळाली पाहिजे.' असे त्यांनी प्रारंभीच सांगून ठेवले होते. मामांच्या कीर्तन-प्रवचनांना मंडळीने कधीही आडकाठी केल्याचे नमूद नाही.

न्यू पूना कॉलेज, त्याचेच पुढे रूपांतरित झालेले सर परशुरामभाऊ कॉलेज, नूतन मराठी विद्यालय, माटुंग्याचे रामनारायण रुइया कॉलेज या सर्व शिक्षण प्रसारक मंडळीच्या शाखा होत. या सर्व शाखांत मिळून मामांनी सुमारे तीस वर्षांचे वर विद्यादानाचे पवित्र कर्तव्य केले. नू. म. वीत ते काही काल मुख्याध्यापक होते. रामनारायण रुइया कॉलेजचे व्हाइस प्रिन्सिपॉल होण्याचा बहुमान त्यांना लाभला. अध्यापन

कार्याबरोबर संस्था संचालन अशी दुहेरी जबाबदारी मामांनी सारख्याच कौशल्याने पार पाडली. ही जबाबदारी पार पाडताना ते कधी मृदू होत, तर कधी कठोर होत. विद्यार्थि–विद्यार्थिनींचे आपण पालक आहोत ही जाणीव त्यांचे मनी सदैव जागी असे.

१९५१ साली मामा शिक्षण प्रसारक मंडळीच्या सेवेतून निवृत्त झाले. मंडळीचे अधिकारी, सहकारी आणि शिष्य यांनी या प्रसंगी त्यांना जे मानपत्र दिले ते वाचले असता त्यांची योग्यता ध्यानी येते.

ॐ

जो सकलकर्मी वर्ततां । देखे आपुली नैष्कर्म्यता ।
कर्मसंगें निराशता । फळाचिया ॥

ज्ञानेश्वरी अध्याय ४/९३

हरिभक्तपरायण प्राचार्य शंकर वामन ऊर्फ सोनोपंत दांडेकर यांसी,

शिक्षण प्रसारक मंडळीच्या दीर्घकालीन सेवेमधून आपण निवृत्त होत आहां. याप्रसंगी आम्ही आपले सहकारी, स्नेही, शिष्य आणि भक्त एकत्र येऊन आपणांस हे मानपत्र प्रेमपूर्वक अर्पण करीत आहो. त्याचा आपण स्वीकार करावा.

ज्या शिक्षण प्रसारक मंडळीच्या सेवेसाठी तरुणपणीच आपण प्रतिज्ञाबद्ध झाला त्या शिक्षण प्रसारक मंडळीच्या नूतन मराठी विद्यालयांतच आपले शिक्षण झाले. पुढे आपण एम. ए. परीक्षा उत्तीर्ण होताच शिक्षण प्रसारक मंडळींच्या सेवेत तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक म्हणून त्यावेळच्या न्यू पूना कॉलेजमध्ये दाखल झाला. १९२० साली आपण शिक्षण प्रसारक मंडळीच्या आजीव सभासदांमध्ये प्रविष्ट झाला. तेव्हापासून आज एकतीस वर्षे झाली, आपले अध्यापनाचें व जनसेवेचे कार्य अविरत चालू आहे. या दीर्घ काळांत तत्त्वज्ञानाचे विद्वान आणि विद्यार्थिप्रिय प्राध्यापक म्हणून आपण थोर लौकिक संपादन केला.

या व्यतिरिक्त संस्थेच्या सर्वांगीण उन्नतीसाठी विविध क्षेत्रांत आपण भरघोस कार्य केले. नूतन मराठी विद्यालयाच्या प्राथमिक शाळेचे प्रमुख, सर परशुरामभाऊ व रामनारायण रुइया या महाविद्यालयांचे

प्राचार्य इत्यादी विविध नात्यांनी आपण जबाबदारीने व तत्परतेने संस्थेचीं जी बहुमोल सेवा केली, तिचे आम्हांस नित्य कृतज्ञतापूर्वक स्मरण राहील. संस्थेने वेळोवेळी सोपविलेली महत्त्वाची इतरही अनेक कामे आपण उत्तम प्रकारे पार पाडली.

आपण काही वर्षे पदवीधरांच्या वतीने मुंबई विद्यापीठाच्या सदस्य मंडळावरही निवडून आला, आणि त्याही मार्गाने आपण संस्थेची सेवा केली. आपला भक्तिप्रवण व आध्यात्मिक मनःपिंड लक्षात घेता ही कामे आपणास विशेष रुचणार नव्हती. तरीही आपण कर्तव्यबुद्धीने आपले कार्य पार पाडिले. पुणे विद्यापीठाची स्थापना झाल्यावर तर आपणावर अधिकच जबाबदारी येऊन पडली. पुणे विद्यापीठाच्या विविध अंगोपांगांशी आपला अधिकारतःच निकटचा संबंध आला, आणि त्याच्या सर्व कार्यामध्ये आपण आत्मीयतेने लक्ष घातले. हा सर्व कारभार आपण आनंदाने उचलला.

शहाणे करून सोडावे । सकळ जन ।।

हे संतवचन आपल्या मनावर बिंबलेले असल्यामुळे आपण ग्रंथद्वारा व लेखनद्वाराही ते कार्य यथाशक्ती केलेले आहे. ‘ ज्ञानेश्वर चरित्र, ईश्वरवाद, वारकरी पंथाचा इतिहास, अध्यात्मविद्येची मूलतत्त्वे,’ हे आपले ग्रंथ जाणत्या वाचकांच्या आदरास पात्र झाले आहेत. सांप्रत आपण ‘ प्रसाद ’ मासिकाच्या संपादक मंडळात कार्य करीत आहात. आपला तत्त्वज्ञान विषयावरील अधिकार जाणून अखिल भारतीय तत्त्वज्ञान परिषदेने पुणे येथील प्रसंगी आपली Ethics and Social Philosophy... या शाखेच्या अध्यक्षस्थानी योजना केली आहे. या आपल्या सन्मानामुळे आमचा आपल्याविषयीचा अभिमान दुणावला आहे.

आपल्या आध्यात्मिक जीवनाची वाटचाल वैकुंठवासी विष्णुबुवा जोग यांच्या वाटाडेपणाने झाली. विद्यार्थिदशेपासूनच आपण वारकरी पंथातील सुविख्यात संत वैकुंठवासी विष्णुबुवा जोग यांचे शिष्य आहा. त्यांच्या हातूनच आपण वारकरी पंथाची “ माळ ” घेतली. पाऊस-पाण्याची किंवा इतर अडचणींची क्षिती न बाळगता आळंदी–पंढरीच्या

वारीचा नेम आपण प्रतिवर्षी नियमितपणे चालविला आहे. चंद्रभागेच्या वाळवंटात आणि इतरही शेकडो ठिकाणी गळयात वीणा घालून आपण भगवंताचे कीर्तन मुक्तकंठाने करिता व ते सहस्रावधी वारकरीच नव्हेत तर आस्तिक प्रवृत्तीची मंडळी उचंबळचा भक्तिभावाने श्रवण करीत असतात. त्या अपूर्व दृश्याचे वर्णन कोठवर करावे ! गेली अनेक तपे आपण उभ्या महाराष्ट्रावर कीर्तन–प्रवचनांचा अविरत वर्षाव करीत आला आहात. ज्ञानेश्वरीवरील आपल्या प्रवचनांची गोडी केवळ अवीट आहे. ते ऐकताना–

**ज्ञानाचें बोलणें। आणि येणें रसाळपणें।**
**आतां पुरे कोण म्हणे। आकर्णिता ।।**

असेच श्रोत्यांना वाटते. आपल्या प्रवचनांमधून आपले तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक व अध्यात्मानुभवी थोर अधिकारी रामभाऊ रानडे यांच्या शिकवणुकीचाही प्रत्यय येतो.

हरिभक्त परायण प्राचार्य,

आपले वैयक्तिक किंवा सामुदायिक जीवन सफल करावयाचे असेल तर मनुष्याने समाजातील परमार्थपर प्रवृत्तीची ज्योत नित्य तेवत ठेवली पाहिजे. हा भागवतधर्मी संतांचा सिद्धान्त आपणास रुचला, पटला, तद्नुसार आपण नैष्ठिक ब्रह्मचर्याने राहून आपले कार्य करीत आहां.

आणि पुढेही कराल यात संशय नाही. आपल्या कीर्तन–प्रवचनांच्या अखंड प्रवाहात महाराष्ट्र सुस्नात व्हावा आणि आपले कर्तव्य चोखपणे करण्यास सिद्ध व्हावा, हीच आमची इच्छा आहे व आम्ही ती या प्रसंगी व्यक्त करितो. पंढरीच्या विठ्ठलाने, अलंकापुरीच्या ज्ञानदेवाने आणि देहूच्या तुकोबाने आपणावर वरदहस्त ठेविला आहे. त्यांच्या वरदानाने आपणांस निरामय असे दीर्घ आयुष्य लाभावे आणि आपला व आमचा संबंध भविष्यकाळीही असाच अतूट राहून याहीपेक्षा उज्ज्वल सेवा आपल्या हातून व्हावी अशीं आमची हार्दिक इच्छा आहे. तें सामर्थ्य पांडुरंगाने आपणांस द्यावे.

दिनांक
ज्येष्ठ वद्य ११, शके १८७३
(३०–६–१९५१)

आपले
सहकारी, स्नेही–शिष्य
आणि भक्त.

वरील मानपत्राच्या निमित्तानें त्यांच्या चाहत्यांनी ३०-३२ हजार रुपयांचा एक निधी गोळा केला व तो मामांना अर्पण केला.

मामा आजन्म ब्रह्मचारी. संसाराचा मायापाश त्यांना नव्हताच. जनताजनार्दन हाच त्यांनी संसार मानलेला. स्वतःला मिळालेल्या निधीत त्यांनी आणखी काही रकमेची भर घातली आणि हा निधी विविध संस्थांच्या योगक्षेमार्थ अर्पण केला. 'प्राचार्य दांडेकर वाङ्मय निधी' ही प्रकाशन संस्था या निधीतूनच कार्यान्वित झाली.

शिक्षण प्रसारक मंडळीच्या विविध संस्थांतून अध्यापनाचे कार्य करीत असताना मामांची राहणी उच्च, साधी व सदाचारसंपन्न होती. 'जगात जे काही जीवन आहे, ते सर्व ईश्वराने निर्माण केलें आहे. त्याच्या नावाने त्यागून यथाप्राप्त भोगीत जा. कोणाच्याही धनाविषयी वासना राखू नकोस.'

'इहलोकी कर्म करींत करीत शंभर वर्षे जगण्याची इच्छा धरावी. तुला देहवंताला हाच मार्ग आहे; याहून वेगळा मार्ग नाही. मनुष्याला कर्म चिकटत नाही, फलवासना चिकटते.'

ईशावास्य वृत्तीतील वरील अवतरणात ध्वनित केल्याप्रमाणे गुरुवर्य मामा जगले. विद्यादानाचे प्राप्तकर्म त्यांनीं निष्ठेनें व प्रामाणिकपणें केले. ते करीत असता धनाची अभिलाषा त्यांच्या मनाला कधीही शिवली नाही. उद्याचा विचार त्यांना कधीही भेडसावीत नसे. त्यांचा सर्व व्यवहार उघड असे. त्यात गुपित काही नसे. कर्तव्य करिताना क्वचित प्रसंगी काही थोरांची मने दुखविण्याचा प्रसंग त्यांच्या जीवनात आला नसेल असे नाही. पण संस्थेच्या हिताखातर मामांनी पथ्यकर उपाय योजण्यात मागें-पुढे पाहिले नाही.

निवृत्तीनंतर शिक्षण प्रसारक मंडळीकडे मामांची सात हजार रुपयांची ठेव होती. ती रक्कम कशी खर्च झाली वा झाली नाही यासंबंधी त्यांच्या बोलण्यात आले नाही. सार्थ ज्ञानेश्वरींच्या विक्रीतून त्यांना मानधन म्हणून प्रतीमागे एक रुपया मिळत असे. ही ४००० रु. ची रक्कम त्यांनी पंढरपूर येथील जोगमहाराज सदनाच्या इमारतीसाठी देणगी म्हणून देऊन टाकली. माधवबाग (मुंबई) श्रावणमास समाप्तीला

किंवा वारकरी शिक्षण संस्थेच्या कार्यासाठीही ते अन्यरूपाने मदत करीत.

मामा धनसंचयाबाबत किती उदासीन असत, त्याची एक आठवण सांगतो. अलीकडे ते वारंवार आजारी पडत व त्यामुळे डॉक्टरांची फी द्यावी लागे. (निदान मनात असे.) मामा त्यावेळी सरकारी नामदेव गाथा समितीचे सभासद होते. प्रवासखर्चापोटी सरकारकडून त्यांना १००० रुपये येणे होतें. ही रक्कम मिळाली की डॉक्टरांना देऊन टाकीन व त्यांच्या ऋणातून मुक्त होईन असे ते म्हणत. अशा रीतीने सेवानिवृत्त होऊनही मामांजवळ स्वतःचे असे धन नव्हते. 'ज्ञानदीप लावूं जगी' या संत नामदेवांच्या उक्तीप्रमाणे ज्ञानप्रसार आणि ईशभक्ती यातच त्यांचे सारे जीवन व्यतीत होत होते.

सेवानिवृत्तीनंतर मामांच्या वाटचाला जे दीड तपाचे आयुष्य आले ते सर्व त्यांनी जनताजनार्दनाच्या सेवेत खर्च केलें. महाराष्ट्राच्या बहुतेक सर्व जिल्ह्यांतून मामांनी संचार केला. कोठें कीर्तन, कोठें प्रवचन, कोठें नामसप्ताह तर कोठें मंदिर–उद्‌घाटन अशा विविध कार्यक्रमांत ते अखंड निमग्न राहिले. ज्ञानेश्वर आणि तुकोबांची शिकवण महाराष्ट्रांतील आम जनतेला देण्याचे मामांचे ब्रीद होते. या उदात्त शिकवणुकीमुळे माणूस सुसंस्कृत, शीलसंपन्न, नीतिमान होतो अशी त्यांची श्रद्धा होती. प्रकृतीची हेळसांड करून त्यांनी सुशिक्षित-अशिक्षित अशा साऱ्या जनतेला आपल्या कीर्तन-प्रवचनांद्वारा भक्तिमार्ग दाखविला. ज्ञानेश्वर, तुकाराम, नामदेव, एकनाथ आदी संतांचे वाङ्मय अशिक्षित गोरगरिबांपर्यंत पोचविणे व त्यांना सदाचरणास प्रवृत्त करणे हे मामांचे कार्य महाराष्ट्र कदापि विसरणार नाही.

पंढरपूर म्हणजे दक्षिण काशी. या क्षेत्राचे महात्म्य साधु-संतांनी अपार भक्तीने वर्णिले आहे. वारकरी संप्रदायाचे पंढरी म्हणजे माहेरघर. श्रीविठ्ठलाच्या दर्शनासाठी आज शतकानुशतके वारकऱ्यांच्या दिंड्या पंढरपुरास प्रतिवर्षी जात आहेत. वारकऱ्यांची संख्या दरवर्षी वाढतच आहे. गुरुवर्य मामांची पंढरीवारी कधी टळली नाहीं. त्यांच्या कीर्तन–प्रवचनांमुळे अलीकडे पंढरीच्या वारीला आणखीनच उधाण येत गेले.

वारकरी संप्रदायाच्या विकासासाठी वै. जोगमहाराज यांनी

वारकरी शिक्षण संस्था स्थापन केली. गुरुवर्य मामांनी जोगमहाराजांच्या पश्चात या संस्थेला बांधीव रूप दिले. वारकरी शिक्षणाचा त्यांनी पद्धतशीर अभ्यासक्रम आखला, चार वर्षे मुदतीच्या परीक्षा सुरू केल्या आणि वारकरी विद्यार्थ्यांच्या निवास-भोजनाची सोय केली.

वारकरी शिक्षण संस्थेद्वारा मामांनी केलेले कार्य अनमोल म्हटले पाहिजे. वारकरी संप्रदायाची परंपरा अखंड चालू ठेवावयाची तर आदर्श कीर्तनकार व प्रवचनकार निर्माण झाले पाहिजेत. मामा स्वतः कीर्तने–प्रवचने करून नकळत एक आदर्श निर्माण करीतच होते. पण एवढ्याने काम भागण्यासारखे नव्हतें. भागवत धर्म आणि त्याचा प्रचार करणारा वारकरी संप्रदाय अखंड चालू राहण्यासाठी अनेकांचें हात या कामी लागणे जरूर होते. कीर्तन, प्रवचन, दिंडी, फड इत्यादीं वारकरी संप्रदायाच्या बहुविध अंगांचा अभ्यास करणारी नवी पिढी तयार करणे हे कार्य महत्त्वाचे होते. गुरुवर्य मामांनी वारकरी शिक्षण संस्थेच्याद्वारे हे कार्य निष्ठेने केले.

मामांचा निवास पुण्यात लक्ष्मी रोडवर गोखले वाड्यात असे. पण तो नावालाच. कीर्तन-प्रवचनांसाठी त्यांना ठिकठिकाणांहून इतकी बोलावणी येत की, सारा महाराष्ट्र हेच जणू त्यांचे निवासस्थान बनले होते. पत्रव्यवहाराच्या सोयीसाठी पुण्याप्रमाणे त्यांनी आळंदीला एक पर्यायी व्यवस्था ठेविली होती. या व्यवस्थेत मी एकदा होतो व मामांकडून आतिथ्यही घेतले आहे. पण खरे पाहता मामांचा संचार सर्वत्र असे. 'ज्ञानदीप लावूं जगी'ची पताका खांद्यावर घेऊन हा महानुभाव आज पुणे तर उद्या पंढरपूर, आज आळंदी तर परवा मुंबई असा संचार करीत होता.

# आदर्श वारकरी

गुरुवर्य मामांना त्यांच्या वडिलांनी इंग्रजी शिकण्याकरिता पुण्याला ठेविले. त्याचे दोन मोठे फायदे झाले. एक म्हणजे ते चांगले उच्च पदवीधर होऊन व्यवसायास लागले आणि दुसरा त्याहून महत्त्वाचा असा की, त्यांची पूज्य जोगमहाराजांशी गाठ पडली. भेट किंवा गाठ हा शब्द अप्रस्तुत आहे. मामा श्री. सोहोनी यांचे वाड्यात राहात व शेजारच्या वाड्यात जोगमहाराजांचा निवास असे. त्यामुळे कुमारावस्थेतच मामांचे जोगांकडे जाणे घडे व त्यांची प्रवचने कानी पडत. होताहोता बाराव्या वर्षी, म्हणजे १९०८ साली मामांनी गुरुमहाराजांकडून माळ घेतली. आळंदी–पंढरपूरची ते वारी करू लागले. गुरूंनी मामांना माळ घालते वेळी कोणता मंत्र दिला वा विधी केला हे समजण्यास मार्ग नाही. मामांना याविषयी मीही कधी विचारले नाही. आता मात्र मनात येते की, मामांजवळ हा विषय आपण केव्हातरी काढावयास हवा होता, व त्यांच्या साधनेचे गुह्य समजून घ्यावयास हवे होते. मामा कुमार अवस्थेत असल्यापासून एकप्रकारे साधक होते. त्यांचा माझा वीस–बावीस वर्षांचा सहवास. पण त्यांना हातात माळ घेऊन जप करताना मी कधी पाहिले नाही. ते नियमित संध्या करीत. सकाळी व सूर्यास्त समयी. त्यांनी पूर्ववयात पारायणे केली किंवा कसे हे समजण्यास मार्ग नाही.

**साधकाची दशा उदास असावी ।**
**उपाधि नसावी अंतर्बाह्य ।।**

या तुकाराममहाराजांच्या उक्तीप्रमाणे मामांचे आचरण असे.

एक गोष्ट मात्र ध्यानी आली की, त्यांनी आमरण आळंदी-पंढरपूर वारी साधना म्हणून केली. मामांनी दीक्षा कोणत्या तिथीस घेतली, ही तिथी ते कोणती साधना करून घालवीत (साजरी करीत) हे मात्र

माझ्या कधी ध्यानी आले नाही. पण असे असले तरी पूज्य तुकाराम-महाराज यांच्या अनुग्रह तिथीस (माघ शु।। १०) मामा इगतपुरी येथे पूज्य लक्ष्मणबुवा यांच्याकडे जात असत. ' सत्यगुरु सये कृपा मज केली ' हा महाराजांचा अभंग निरुपणास घेत असत. निर्याण होईपर्यंत त्यांचा हा नेम चालू होता.

मी स्वतः श्रावण शु।। ११ (एकादशीस) मामांकडून माळ घेतली. पंढरपूर येथे श्रीपांडुरंगाच्या दर्शनास जाण्याच्या प्रमुख चार एकादश्या आहेत. त्यातील आषाढ शु।। एकादशी तर सर्वात महत्त्वाची आहे. या शुभ दिनी पालखीरूपाने सकळ संत प्रभू पांडुरंगाचे दर्शनास येत असतात. कार्तिक शुद्ध एकादशीचे महात्म्यही असेच मोठे. त्याखालोखाल माघ शुद्ध एकादशी आणि चैत्र शुद्ध एकादशी या महत्त्वाच्या समजल्या जातात. वरीलपैकी एखादे एकादशीस माळ घालून वारकरी पंथाची दीक्षा घेणे हेच श्रेयस्कर. माळ अर्थातच गुरूकडून घालून घ्यावी. वर्षातील कोठल्याही महिन्याची शुद्ध एकादशी वारी म्हणून श्रीपांडु-रंगाच्या दर्शनास जाणे श्रेयस्कर आहे.

फड वा दिंडी या परंपरेने चालत आलेल्या गोष्टी आहेत. त्या त्या फडाचे वा दिंडीचे प्रमुख पूजनीय विभूती गुरू असतात. आपण कोठल्याही फडात वा दिंडीत नाही. त्यामुळे आपणास माळ कोण घाल-णार असे ज्यांचे मनात येते त्यांच्याकरिता मी सुज्ञांची क्षमा मागून काही गोष्टी नमूद करतो.

स्वतःचे उदाहरण द्यायचे झाले तर मी कोठल्याही दिंडीत नस-लेला, पण गुरुवर्य मामांच्या आशीर्वादाला पात्र झालेला भाग्यवान माणूस आहे. तसे पाहिले तर वारकरी पंथ हा कृष्णोपासक. पण माझ्या कुळाची देवता आहे श्री " काळेश्वर " म्हणजे मी शिवपंथी ठरतो. पण माझ्या अवलोकनानुसार वारकरी भक्तांत राम, शिव, दत्त इत्यादी देवतांची उपासना करणारे सर्व प्रकारचे वारकरी आहेत. याचा अर्थ वारकरी पंथ स्वीकारण्यास आपली कुलदेवता (आईदेवी का असेना) बिलकुल आड येत नाही. ज्या साधकाला वारकरी पंथ स्वीकारायचा

असेल त्याने पुढील पथ्ये पाळावी व तसे प्रतिज्ञाबद्ध (व्रती) होऊन श्रद्धापूर्वक आचरणशील राहावे.

उपास्य देवता–पांडुरंग–गळ्यात १०८ मण्यांची–मेरूसह तुलसी-काष्ठ मण्यांची माळ धारण करावी. आषाढ शु॥ ११, कार्तिक शु॥११, माघ शु॥ ११ व चैत्र शु॥ ११ यांपैकी एका एकादशीस गळ्यात तुळशीची माळ घालून प्रतिवर्षी नियमितपणे पंढरपूर येथे वारीकरिता गेले पाहिजे म्हणजे कोणती तरी एक वारी त्याने पत्करली पाहिजे.

अशा तऱ्हेची मनोधारणा एकदा झाली की, साधकाने आपणच आपल्याला मुक्त करून घ्यावे. त्याने मनोमनी गुरुवर्य मामांना गुरुस्थानी मानावे. श्री ज्ञानेश्वरमहाराजकृत हरिपाठ नित्य पाठात ठेवावा. श्री ज्ञानदेवीची (शक्यतो गुरुवर्य मामांची सार्थ ज्ञानेश्वरी) प्रत संग्रही बाळगावी. नंतर आळंदी येथे जाऊन श्री ज्ञानेश्वरमहाराज यांचे समाधी-दर्शन घ्यावे. समाधीची पूजा करीत असतानाच (समाधीचे पुढे पाटावर श्रीज्ञानेश्वरीची पोथी, त्यावर तुळशीकाष्ठ मण्यांची माळ ठेवावी) श्री ज्ञानेश्वरी व त्या पोथीवरील माळ यांची पूजा करावी. (महापूजा वा पंचामृताची पूजा नव्हे) व नंतर बुक्का श्रीज्ञानेश्वरमहाराज यांचे समाधीवर, पोथीवर व तुळशीमाळेवर वाहावा व नमस्कारयुक्त अंतः-करणाने माऊलीचे व गुरुवर्य पूज्य मामांचे ध्यान करून

रामकृष्ण हरि (विठ्ठल केशवा)

अथवा

ॐ नमो भगवते वासुदेवाय

यांपैकी कोणताही एक मंत्र–पूजनीय गुरुवर्यांनी कानात आदेशात्मक सांगितला आहे–अशी श्रद्धा ठेवून पोथीवरील माळ उचलून गळ्यात घालावी. शेवटी "पुंडलिकावरदा हरिविठ्ठल" नामाचा गजर करून प्रार्थना करावी व मनोमनी पुढील व्रताचा अंगीकार करावा.

"मी आजपासून यमनियमांचें जे मूळ– परस्त्री, परधन, मांसा-हार, मद्यपान यास शिवणार नाही. पंढरपूर–आळंदी दरवर्षी वारी करीन. तुळशीमाळ गळ्यात नित्य ठेवीन. यदाकदाचित ती कधी तुटली तर पूर्ववत गुंफून गळ्यात घालीन व तोपावेतो अन्नग्रहण करणार नाही.

रोज जप (किमान पक्षी दहा माळा), हरिपाठ, श्रीज्ञानेश्वरी वाचन आदी पाळत राहीन. माऊलींच्या, गुरुदेवाच्या आशीर्वादासाठी प्रार्थना करीन कीं, जेणेकरून संकल्प निरंतर आचरणात आणीन. (राहावा यत्नशील राहीन.)"

वर सूचित केल्याप्रमाणे गुरुवर्य मामा आषाढीवारीला श्री ज्ञानेश्वरमहाराज यांचे पालखीबरोबर कित्येक वर्षे पंढरपूर येथे गेलेले आहेत. या पालखीचा मार्ग व माहिती संक्षिप्तपणे पुढे देत आहे. पालखीच्या सोहळचाला आज जें विराट स्वरूप आले आहे त्याचे श्रेय श्री ज्ञानेश्वरमहाराज देवस्थान समिती व ह. भ. प. गुरुदेव हैबतराव वाबा आरफळकर यांना आहे.

## प्रस्थान

प्रतिवर्षी ज्येष्ठ वद्य अष्टमीस पालखीचे होतें. या दिवशी दुपारी चारचे सुमारास माऊली मंदिरातून समारंभाने पालखीतून पादुकारूपाने निघतात व त्या दिवशी आजोळी गांधी यांचे वाडचात विसावतात. (राहातात). जर अष्टमी गुरुवारी आली तर पालखी प्रदक्षिणेनंतर रात्रौ ९ चे सुमारास मंदिरातून समारंभाने निघते. या प्रस्थान सोहोळचास शेकडो भाविक प्रतिवर्षी उपस्थित असतात व माऊलींना निरोप देतात.

पालखीची वाटचाल पंढरपूरच्या दिशेने येणेप्रमाणे होते.

| तिंथी | प्रस्थान स्थान | मुक्कामाचे स्थान |
|---|---|---|
| जेष्ठ व॥ ९ | आळंदी | पुणे |
| जेष्ठ व॥ १० | सर्व दिवस मुक्काम पुणे | |
| जेष्ठ व॥ ११ | पुणे | सासवड |
| जेष्ठ व॥ १२ | सर्व दिवस मुक्काम सासवड | |
| जेष्ठ व॥ १३ | सासवड | जेजुरी |
| जेष्ठ व॥ १४ | जेजुरी | वाल्हे |
| जेष्ठ व॥ ३० | वाल्हे | लोणंद |
| आषाढ शु॥ १ | सर्व दिवस मुक्काम लोणंद | |
| आषाढ शु॥ २ | लोणंद | तरडगाव |

| तिथी | प्रस्थान स्थान | मुक्कामाचे स्थान |
|---|---|---|
| आषाढ शु।। ३ | तरडगाव | फलटण |
| आषाढ शु।। ४ | फलटण | बरड |
| आषाढ शु।। ५ | बरड | नातेपुते |
| आषाढ शु।। ६ | नातेंपुते | माळशिरस |
| आषाढ शु।। ७ | माळशिरस | वेळापूर |
| आषाढ शु।। ८ | वेळापूर | शेंहगाव |
| आषाढ शु।। ९ | शेंहगाव | वाखरी |

शेंहगावहून दुपारी १ चे सुमारास पालखी निघून **उभे रिंगण, आडवे रिंगण** इत्यादी सर्व नियमितपणे, वेळच्या वेळी करून सायंकाळी ६ चे सुमारास ती वाखरी येथे पोहोचते. आषाढ शु।। नवमीस सर्व संतांच्या पालख्या वाखरीस सायंकाळी पोहोचतात.

आषाढ शुद्ध दशमीस माऊलीच्या पालखीसह सर्व संतांच्या पालख्या दुपारी मोठ्या सोहळयाने निघून रात्री पंढरपुरात येऊन आपापल्या मठात मुक्काम करतात. काला होईपर्यंत (गुरुपौर्णिमेपर्यंत) त्यांचे वास्तव्य पंढरपुरात प्रभू पांडुरंगाचे सन्निध असते.

गुरुवर्य मामांच्या साधनेचे टिपण वरील संदर्भात दिले आहे. त्यांची राहणी साधी होती. ते महाराज वगैरे वाटत नसत. पूज्य जोग-महाराज यांच्याप्रमाणे ते सोऽहं सिद्धीचे ज्ञानमार्गी होतें.

**काही मनोभूमिका**

अनुग्रहतिथी— वाढदिवस—या दिवशी रोजच्या दैनंदिन कामास रजा द्यावी. तीन सहस्र जप करावा. आचार्योपासनेसाठी ज्ञानदेवींतील ओव्या मननपूर्वक वाचाव्या. चांगदेव पासष्टी मननपूर्वक (अभ्यास-पूर्वक) वाचावी.

आत्मचिंतन (परीक्षण) करावे. गतसालाचा आढावा आध्या-त्मिक दृष्टीने घ्यावा. गतवर्षी आपण काय साधना केली त्याचे शक्यतो टाचण लिहून काढावे, शक्य झाल्यास एखादा नवा नेम धरावा व त्या-करिता जरूर ती साधना चालू करावी. आपल्यातील (चिंतनातून समजलेल्या) उणिवा आपणच जाणून घ्याव्यात व त्या दूर करण्याचे

व पुन्हा होऊ नये याकरिता उपाय शोधून यत्नशील राहावे. कांही वेळ दररोज मौन पाळावे

## पंढरपूर

चंद्रभागेत स्नान, श्री पुंडलिकाचे दर्शन– पांडुरंग दर्शन, नगर प्रदक्षिणा, बाकीचा वेळ कीर्तन–प्रवचन–भजन यात घालवावा.

श्री ज्ञानेश्वरमहाराज यांचे जयंतीनिमित्त अथवा श्रीकृष्णजयंती-निमित्त श्रावण वद्य प्रतिपदा ते श्रावण वद्य अष्टमी श्री ज्ञानेश्वरी पारायण खालीलप्रमाणे करावे.

| तिथी | दिवस | अध्याय |
|---|---|---|
| श्रावण वद्य १ | १ ला | १ ते ५ |
| श्रावण वद्य २ | २ रा | ६ ते ९ |
| श्रावण वद्य ३ | ३ रा | १० ते १२ |
| श्रावण वद्य ४ | ४ था | १३ व १४ |
| श्रावण वद्य ५ | ५ वा | १५ ते १७ |
| श्रावण वद्य ६ | ६ वा | अध्याय १८ श्लोक ६४ |
| | | १३५२ ओव्या |
| श्रावण वद्य ७ | ७ वा | १८ वा अध्याय |
| | आरती | उर्वरित ओव्या |
| श्रावण वद्य ८ | ८ वा | संपूर्ण गीता |

## गुरुवर्य मामांचे प्रतिवर्षीचे नैमित्तिक कार्यक्रम

### कीर्तन–प्रवचने

| तिथी | स्थळ | कीर्तन–प्रवचन |
|---|---|---|
| चैत्र शुद्ध प्रतिपदा (पाडवा) | आळंदी | श्री माऊलींची महापूजा. |
| चैत्र शु. २ ते ९ (रामनवमी) | पुणे | शेडगे विठोबा, रामनवमी उत्सव निवडुंग्या विठोबा, मुंबई इ. ठि. |
| चैत्र शु. ११ ते १५ | पालघर | बाहेरगावी कार्यक्रम |
| चैत्र वद्य ३० | पुणे | उटीचे कीर्तन (शेडगे विठोबा) |
| वैशाख अक्षयतृतीया | पुणे | निवडुंग्या विठोबा |
| वैशाख वद्य मास | पुणे | ॐकारेश्वर मंदिर–उटीचे कीर्तन |

| तिथी | स्थळ | कीर्तन-प्रवचन |
|---|---|---|
| जेष्ठ वद्य ११ | पुणे | निवडुंग्या विठोबा |
| आषाढ शुद्ध ११ ते १५ | पंढरपूर | नामदेव मंदिर (एकादशी) |
| | | कुकुर मुंडेकर मठ (द्वादशी) |
| | | खाजगीवाले वाडा (त्रयोदशी) |
| | | नारायण गडकरी फड (चतुर्दशी) |
| | | नामदेव मंदिर (पौर्णिमा) |
| आषाढ वद्य ८ | पुणे | रावसाहेब स. के. नेऊरगावकर यांचे घरी |
| आषाढ वद्य ९ | पुणे | पालखीपुढे (भवानी पेठ) |
| आषाढ वद्य ११ | पुणे | प्रा. ओतुरकर यांचे घरी |
| आषाढ वद्य १२–१३ | मुंबई | सावतामाळी व नामदेवमहाराज पुण्यतिथी |
| श्रावणमास | मुंबई | माधवबाग दर गुरुवार, शनिवार, रविवार |
| श्रावण वद्य १ ते ८ | | गोकुळअष्टमी उत्सव, मुंबई, पुणे, ठाणे, जत इत्यादी ठिकाणी |
| भाद्रपद | | गणेशोत्सवात ठिकठिकाणी ज्ञानेश्वरी प्रवचने |
| आश्विन शु।। १० दसरा | पुणे | निवडुंग्या विठोबा |
| आश्विन शु।। १५ कोजागिरी पौर्णिमा | पुणे | शेडगे विठोबा |
| आश्विन वद्य | आळंदी | ज्ञानोबा देहूकर शाळा |
| कार्तिक शु।। ११ ते १५ | पंढरपूर | नामदेव मंदिर (एकादशी) |
| | | धुंडामहाराज मठ (द्वादशी) |
| | | खाजगीवाले वाडा (त्रयोदशी) |
| कार्तिक वद्य ११ | आळंदी | कऱ्हाडकर फड (चाकण रस्ता) |
| कार्तिक वद्य १२ | आळंदी | सखारामबुवा कवाडकरांच्या पालखीसमोर सकाळी, फूटवाले धर्मशाळा सायं. |

| तिथी | स्थळ | कीर्तन प्रवचन |
|---|---|---|
| मार्गशीर्ष शु॥ ११ | पुणे | गीता जयंतीनिमित्त चंपाषष्ठी खंडोबा मंदिर |
| मार्गशीर्ष वद्य १०–१३ | सासवड | सोपानदेव मंदिर, पुरंदरे वाडा |
| पौष वद्य ६ | सांगली | कोटणीसमहाराज पुण्यतिथी |
| पौष वद्य १०–१३ | नाशिक–त्र्यंबकेश्वर | कीर्तन प्रवचने |
| माघ शु॥ १० | इगतपुरी | जोगमहाराज मठ |
| माघ शु॥ १२–१३ | पुणे | महर्षी पटवर्धन पुण्यतिथी, ॐकारेश्वर |
| माघ वद्य १ | आळंदी | वै. जोगमहाराज समाधी |
| माघ वद्य ९ | पुणे | समर्थ पुण्यतिथी |
| फाल्गुन शु॥ २ | पुणे | रामकृष्ण मठ, नवी पेठ विठोबा मंदिर किंवा शेडगे विठोबा |
| फाल्गुन वद्य २ | देहू (सुदुंब्रे) | तुकाराममहाराज पुण्यतिथी |
| फाल्गुन वद्य ६ | देहू | नाथषष्ठी |

दर महिन्याचे शुद्ध एकादशीस पुणे निवडुंगे विठोबा मंदिर व वद्य एकादशीस आळंदी अगर इतर मुक्कामाचे ठिकाणी कीर्तन प्रवचने होत असत. अगदी काही नाही तरी घरी दररोज एक तास ज्ञानेश्वरी प्रवचन असा मामांचा कटाक्ष असे.



# गुरुवर्य मामांचे आचारविचार

गुरुवर्य मामांची राहणी अगदी साधी नि विचारसरणी उच्च कोटीतली. त्यांचे परमभाग्य हे की बालवयात त्यांना वै. जोगमहाराजांचे सान्निध्य लाभले. मामांच्या गळ्यात ब्रह्मचर्याचा ताईत होता. जोगमहाराजांच्या शेवटच्या आजारात त्यांनी ब्रह्मचर्यव्रताचा शब्द दिला आणि तो शेवटपर्यंत पाळला.

मामांचे घराणे सुखवस्तू आणि वैदिक आचार धर्माचे. सर्व प्रकारची अनुकूलता त्यांना लाभलेली. गौरवर्ण, उत्तम संस्कार, उच्च शिक्षण आणि नोकरी प्राध्यापकाची. पण इतके असून त्यांना संसाराचा मोह झाला नाही. जोगमहाराजांची वाट पुसत त्यांनी भागवतधर्माचा प्रसार आयुष्यभर केला. "मांडीना स्वतंत्र फड" हे त्यांचे ब्रीद होते. जोगमहाराजांचा स्वतंत्र फड नव्हता. मामांचाही वेगळा असा फड नव्हता. आणि तरीही वारकरी पंथाला उजाळा देण्यासाठी त्यांनी आपले आयुष्य व्यतीत केले. मामा वर्णाश्रम धर्म मानीत नसत. कायदा करून समता प्रस्थापित होते यावर त्यांचा विश्वास नव्हता. समता नांदण्यासाठी प्रत्येकानें शुद्धाचरण करून एकमेका साहाय्य करावे व आपला उत्कर्ष करून घ्यावा अशी त्यांची विचारसरणी होती.

हरिजनांना मंदिर प्रवेश मिळावा यासाठी सुमारे चाळीस वर्षांपूर्वी साने गुरुजींनी पंढरपूर येथे उपवास सुरू केला होता. मी त्यावेळी पंढरपुरास होतो. ह. भ. प. गु. कुकुरमंडीकरमहाराज हरिजनांना मंदिर प्रवेश देऊ नये यासाठी उपोषण करीत होते. याप्रसंगी मामांनी फार समंजस भूमिका घेतली होती. महिपतीबुवांचे मठात त्यांचे कीर्तन झाले. "संकोचोनि कारे झालासी लहान" हा अभंग त्यांनी निरूपणास घेतला होता. मामांचे निरूपण मला अजून आठवते.

"आजची प्रगत राहणी लक्षात घेता कालाचे ओघात मंदिर

सर्वांना खुलें होणारच आहे. आज एवढा अट्टाहास धरून संघर्ष निर्माण करण्याची गरज नाही. मंदिर हे पवित्र स्थान आहे. उपासना–प्रार्थना करण्याचे ते ठिकाण आहे. शुचिर्भूत गृहस्थांना मंदिर प्रवेश मिळावा असा आग्रह धरला गेला तर, त्यात अग्राह्य काही नाही. जे असा आग्रह धरितात त्यांनी आधी हरिजनांचे राहणीमान सुधारण्याचा यत्न करावा व मगच कायद्याची कास धरावी. समाजसुधारणा करताना घाई उपयोगी नाही. सक्ती तर मुळीच उपयोगी नाही."

गुरुवर्य मामांना 'कर्म' हवे होते. पण कर्मठपणा नको होता. कर्मठपणावर त्यांची कठोर प्रतिक्रिया व्यक्त होत असे. मात्र वैदिक सनातन धर्माची बैठक त्यांना अभिप्रेत होती. वैदिक धर्मग्रंथांचा– उदाहरणार्थ उपनिषदे, महाभारत, रामायण, भागवत ह्यांचा मामांनी सखोल अभ्यास केला होता. कीर्तन–प्रवचनांत या त्यांच्या अभ्यासाचीं सर्वांना प्रचीती येत असे. मामा सदासर्वकाळ अनासक्त असत. त्यांचे ठायी अमानित्व अत्यंत पराकोटीचे होते. अंगी कधी भयवृत्ती नव्हती, सुखाची लालसा नाही, की धनसंचयाची इच्छा नाही. कासव ज्याप्रमाणे आपली इंद्रियें आकसून ताब्यात ठेवते त्याप्रमाणें मामांनी आपली सकल इंद्रिये काबूत ठेवली होती. ब्रह्मचर्यव्रताच्या पालनार्थं ते सहसा कुणाला आपल्या पायाचा स्पर्श करू देत नसत. महिला वर्गास अंतरावरूनच ते दर्शनसुख देत असत. मामांचे सारे जीवन त्यामुळे समाधानी आणि आनंदी होते.

मामांची ज्ञानसाधना अखंड चालू होती.

"बोधि बोधले तत्त्वता कळो ऐसे आले ।
बाप रखुमादेवीवरु विठ्ठले माझे मीपण हरपले ॥"

याप्रमाणे अथांग ज्ञानी, पण जणू काही त्या गावचे नाही इतकी निरहंकार वृत्ती त्यांचे अंगी होती.

कीर्तन–प्रचन करिताना मामांची श्रोत्यांविषयी एकच एक अपेक्षा असे. ती ही की, आपला श्रोतृवर्ग सदाचारी, ईश्वरभक्त आणि अंतर्मुख व्हावा. आपल्यातील उणिवांची त्याला जाणीव व्हावी व त्या दूर करण्याचा त्याने यत्न करावा. मामांच्या या उदात्त विचारसरणीचा

परिपाक म्हणजे माझ्यासारखे हजारो भक्त महाराष्ट्रात निर्माण झाले.

मामा परमार्थ साधनात गुंतलें असले तरीं व्यवहार त्यांनी सोडला असे नाही. प्रवृत्तीवादी चिरस्थायी कार्याला त्यांनी हातभार लावलेला आहे. शिक्षण प्रसारक मंडळींच्या इमारती किंवा नेवासे येथील (ज्ञानेश्वरी रचनास्थान) मंदिर अशांसारख्या भव्य कामांसाठी मामा झटले आहेत. पण याचनाबुद्धीने नव्हे, तर कर्तव्यबुद्धीने.

मामा जर प्रवृत्तीमार्गी राहाते तर वारकरी शिक्षण संस्थेचे आजचे स्वरूप दिसते त्यापेक्षा ते कितीतरी भव्य टोलेजंग झालेले दिसले असते. अनिच्छेने वा दबाव आणून त्यांनी कोणाकडून देणगी स्वीकारली नाही. या शिक्षणसंस्थेतील अध्यापक वर्ग काही वेगळाच आहे. ते विद्यापीठाचे पदवीधर नसतील, पण ते अध्यात्म वाङ्मयाचे विशारद जरूर आहेत. शिवाय सदाचरणी आहेत. मानधनाची अपेक्षा न करता निर्वाहापुरते मिळते त्यावर ते संतुष्ट असतात, व मामांचा कित्ता गिरवून विद्यादानाचे पवित्र कर्तव्य करीत असतात. सेवावृत्ती हेच त्यांचे ब्रीद आहे. वै. जोगमहाराजांची जन्मशताब्दी आली तेव्हा ती साजरी करण्यासाठी मामा किती तळमळीने झटले ते सांगणे कठीण आहे.

कधी नव्हे ते मामा मला माधवबागेत म्हणाले, "भावे, यंदा भाद्रपद वद्य प्रतिपदेस मी जोगमहाराजांचे वाड्यात प्रवचन करणार आहे." मला प्रथम त्याचा बोध झाला नाही. घरी आल्यावर मी ह.भ.प. गोपाळबुवा रिसबूड यांना पत्र लिहिले. त्यावरून ते प्रवचन जोगमहाराजांच्या जन्मशताब्दीनिमित्त आहे असे समजले.

त्याप्रमाणे मी पुण्याला गेलो. जोगमहाराजांचा वाडा प्रथमच पाहिला. मामांचे विचारप्रवर्तक असे प्रवचन श्रवण करून पावन झालो. या दिवशी ते म्हणाले, "जन्मशताब्दी उत्सव श्री ज्ञानेश्वर मंदिरात व पुण्यतिथीचा उत्सव आणि वारकरी शिक्षण संस्थेचा ५१ वा वाढदिवस इंद्रायणीकाठी बुवांच्या समाधीसमोर करण्याचा विचार आहे."

हा जन्मतिथी सोहोळा सतत १५-१७ दिवस भव्य प्रमाणावर चालू होता. मामा आळंदीस मुक्काम करून राहिले. सर्व आजी—माजी विद्यार्थीवर्गास (वारकरी शिक्षणसंस्था) त्यांनी आमंत्रणे पाठविली.

नेहमीप्रमाणे त्यांच्या निवास–भोजनाची चोख मोफत व्यवस्था केली. विद्यार्थ्यांसमोर अधिकारी पुरुषांची व्याख्याने, कीर्तने करविली. ती टेप केली गेली असती तर आज एक उपयुक्त ग्रंथ वाचावयास मिळता. भपका न करता हा सर्व समारंभ मोठ्या उत्साहाने पार पडला. गुरूची सेवा कशी करावी याचा मामांनी एक आदर्शच घालून दिला. हा सोहोळा ज्यांनी पाहिला ते धन्य होत.

मामा महान भगवद्भक्त होते. ना द्वेष, ना अहंकार. शोक आणि भय यांपासून अलिप्त. मन आणि बुद्धी ईश्वरास वाहिलेली. स्तुतीनें भारावले नाहीत की निंदेने व्याकुळले नाहीत. सदा संतुष्ट वृत्ती. म्हटले तर संसारी, म्हटले तर विरागी. प्रसन्न, गंभीर, सात्त्विक भाव चेहऱ्यावर असणारी मामांची मूर्ती होती. प्रभू पांडुरंगाचे चिंतन, विष्णुसहस्रनामाचा पाठ व प्रभूचेच गुणगान करणारे अभंग–हा त्यांचा क्रम अखेरपर्यंत चालू होता.

## ग्रंथसंपदा

गुरुदेव मामा हे साक्षात्कारी संत होते, जीवनमुक्त विभूती होते. इहलोकातील आपला जीवनक्रम त्यांनी स्तुति–सत्कारापासून अलिप्त ठेवला. इतकेच काय पण "मरावे परी कीर्तिरूपे उरावे" अशीसुद्धा त्यांची आकांक्षा नव्हती. बुद्धिचातुर्य अंगी असूनही त्यांनी तिचे प्रदर्शन केले नाही. त्यांचे हातून जी काही वाङ्मयसेवा घडली ती कीर्ति-लोभाने अथवा धनलोभाने खासच नव्हे. सामान्यजनांस भक्तिमार्ग दर्शवून त्यांना ईश्वरप्राप्ती सुलभ करून द्यावी याच एका हेतूने ते लिहिते झाले.

मामांचे स्वतंत्र ग्रंथ थोडे आहेत. आपणहून विशेष त्यांनी काही लिहिले असे नाही. प्रसंगाप्रसंगाने ते लिहीत गेले व बरेचसे लेखन इतरांच्या आग्रहामुळे त्यांनी केले. तत्त्वज्ञान आणि संत वाङ्मयावरील त्यांचा अधिकार जाणून 'प्रसाद' मासिकाचे एक संपादक कै. य. गो. जोशी यांनी त्यांच्याकडून सार्थ ज्ञानेश्वरी संपादून घेतली. या ग्रंथाला मामांची एक दीर्घ, सोपी, विद्वत्ताप्रचुर प्रस्तावना आहे. ज्ञानदेव चरित्र आणि ज्ञानदेवीचे रहस्य समजण्याच्या दृष्टीने हा सार्थ ज्ञानेश्वरी ग्रंथ अत्यंत उपयुक्त आहे. या ग्रंथाच्या आजवर चार आवृत्त्या प्रकाशित होऊन पाचवी आवृत्ती प्रकाशनाच्या वाटेवर आहे. प्रत्येक भाविकाच्या संग्रही असावा असा हा ग्रंथराज आहे. 'वारकरी भजनावली वा भजन-संग्रह' हा त्यांचा दुसरा संपादनवजा ग्रंथ असाच संग्राह्य असा आहे. (वारकरी शिक्षण संस्थेच्या अभ्यासक्रमात हे पाठ्यपुस्तक संपूर्ण पठणाकरिता आहे.) ज्ञानेश्वरीच्या खालोखाल मामांचे महत्त्वाचे पुस्तक म्हणजे वै. जोगमहाराजांचे भक्तिभावपूर्ण चरित्र. महाराजांच्या जन्मशताब्दीनिमित्त त्यांनी लिहिले व एक प्रकारे गुरूचे ऋण फेडले.

गुरू आणि शिष्य या उभयतांचें जीवनकार्य समजावून घेण्याच्या दृष्टीने हे चरित्र फारच उपयुक्त आहे.

प्रसाद मासिकाच्या संपादकांनी 'ईश्वरवाद' नावाचें आणखी एक पुस्तक मामांकडून लिहून घेतले. सामान्यजनांना निरनिराळ्या बौद्धिक वादांची सुलभरीत्या माहिती व्हावी यासाठी 'वादविवेचनमाला' जोशीबुवांनी प्रकाशित केली. वेगवेगळ्या अधिकारी पुरुषांकडून त्यांनी वादविषयक एकेक पुस्तक लिहून घेतलें. ईश्वरवादावर म्हणजे ईश्वर आहे की नाही, त्याचे स्वरूप काय, त्याची प्राप्ती करून घेण्याचा मार्ग काय इत्यादी प्रश्नांची उकल करण्यास सोनोपंतांशिवाय (मामांशिवाय) अधिकारी पुरुष कोण असणार? जोशीबुवांच्या आग्रहामुळे मामांनी या आवडत्या विषयावर लगेच ग्रंथ लिहून दिला. "ज्ञानदेव आणि प्लेटो" व "वारकरी सांप्रदायाचा इतिहास" ही मामांची दोन पुस्तके या पूर्वीच प्रसिद्ध झाली होती. आकाराने ती लहान असली तरी गुणाने ती मौलिक आहेत.

ज्ञानदेवांप्रमाणे तुकाराममहाराज हे मामांचे आवडते दैवत. मामांच्या कीर्तन-प्रवचनात तुकोबांच्या वाणीचा अंतःकरण उचंबळून उच्चार हटकून असावयाचाच. तुकोबांची सार्थ गाथा संपादित करून त्यांनी वाचकांवर मोठें उपकार करून ठेविले आहेत. मामा दांडेकर-कुलोत्पन्न. या कुलाचा वृत्तांतही त्यांनी संपादन केला आहे.

याशिवाय मामांनी प्रसंगोपात प्रस्तावना लिहिल्या, ग्रंथपरीक्षणे केली, निरनिराळ्या नियतकालिकांतून इंग्रजी-मराठीत लेख लिहिले. हे सर्व लेखन आणि वरील ग्रंथ यांची विस्तृत सूची मी पुढे दिली आहे. ही सूची चाळली असता मामांनी आपले अंगीकृत कार्य करीत असता एवढे साहित्य कसे निर्माण केलें याचा अचंबा वाटतो. मामांचा व्यासंग केवढा मोठा होता याचीही सूचीवरून कल्पना येतें.

# सोनोपंतांची साहित्यसेवा

(निवडक – उल्लेख)

(१) ग्रंथ

१) ज्ञानदेव चरित्र : ग्रंथ व तत्त्वज्ञान
१) ईश्वरवाद
३) वारकरी पंथाचा इतिहास
४) ज्ञानदेव आणि प्लेटो
५) वै. विष्णुबुवा जोगमहाराज यांचे चरित्र
६) अभंग संकीर्तन, भाग १ ते ३

(२) संपादित

१) बंकटस्वामींची ज्ञानेश्वरी (प्रसाद प्रकाशन)
२) तुकाराम गाथा (चित्रशाळा प्रेस)
३) दांडेकर कुलवृत्तांत

(३) महत्त्वाचे लेख

१) " मिस्टिसिझम् इन् महाराष्ट्र " या ग्रंथातील " एकनाथांचे भागवत " हे प्रकरण.
२) समर्थ तुकारामबुवांचे गुरू असतील काय ? (सत्कार्योत्तेजक सभा–सुवर्णमहोत्सव ग्रंथ)
३) शिवकालीन संतांची कामगिरी (शिवाजी निबंधावली)
४) भागवत धर्म (पांगारकर स्मारक ग्रंथ)
५) ज्ञानेश्वर व ज्ञानेश्वरी (केसरी प्रबोध)
६) श्री ज्ञानेश्वरमहाराजांचे तत्त्वज्ञान (ज्ञानेश्वर दर्शन भाग २ रा)
७) श्री ज्ञानेश्वरमहाराजांचे दृष्टीने गीतेचे महत्त्व (तत्त्वज्ञान मंदिर–लेखांक १ ला)
८) ज्ञानेश्वरींचा अभ्यास (सह विचार वर्ष ६ अंक ५)
९) वै. विष्णुबुवा जोग यांचे अल्पचरित्र (ज्ञानसंग्रह)

१०) कर्माचा कायदा इच्छा स्वातंत्र्य (ज्ञानसंग्रह)
११) होळकर घराण्याचा इतिहास (मार्तंड मासिक)
१२) अध्यात्म विद्येचा उपयोग (मनोहर, ऑक्टोबर १९४५)
१३) श्री ज्ञानेश्वरांची जगन्मिथ्यात्वाची कल्पना (तत्त्वज्ञान मंदिर)
१४) श्री मुक्ताबाईचें समाप्ती स्थळ महत् ग्राम–मेहूण होय एदलाबाद नव्हे (आळंदी संस्थान ट्रस्टीतर्फेचे पत्रक)

(४) प्रस्तावना, पुरस्कार व परीक्षणे
१) ब्रह्मलिखित–तांबे
२) श्री कैलास गाथा–श्री एकनाथ सुत
३) संतश्रेष्ठ श्री तुकाराममहाराज यांचे श्लोकबद्ध चरित्र–(मा. गो. भिडे)
४) नामदेव यांची सार्थ गाथा–सुबंध
५) सेनापती बापट वाङ्मय, समग्र ग्रंथ–देव
६) श्री कोटणीसमहाराज यांचे चरित्र–साधुदास
७) कांचनमृग–वि. स. गोगटे
८) तुकारामांच्या अभंगांची चर्चा–रत्नाकर, मार्च १९२८
९) ज्ञानदीप–लोकशिक्षण
१०) एथिक्स ऑफ भगवद्गीता–दे. द. वाडेकर
११) पालखी सोहोळा–स. के. नेऊरगावकर
१२) ज्ञानदेवांची आळंदी–स. के. नेऊरगावकर
१३) सं. सार्थदासबोध–स. के. नेऊरगावकर

(५) न्यू पूना कॉलेजच्या (इंग्रजी) नियतकालिकांतील लेख
1) The Katha Upanishad 1920
2) Dnyandeo and his Philosophy 1923
3) Dnyaneshwari a study (1924)
4) Our Yoga 1936

(६) तत्त्वज्ञान परिषदांमधून वाचलेले निबंध
1) Philosophy and Sadhana
2) Dnyanadeo and Western Philosophy
3) Is God dapad a Buddhist ?

(७) पुणे तत्त्वज्ञान मंडळापुढे वाचलेला निबंध
1. The Doctrine of Appearance in Bradley

# गुरुवर्य मामांचा आजार व वैकुंठवास

गुरुवर्य मामांचा सहवास मला २०–२२ वर्षे घडला. पण या काळात त्यांना कोणकोणते आजार होते याची मला पुरेशी कल्पना नाही. त्यांची प्रकृती निकोप, सुदृढ होती असेच एकूण म्हणावे लागेल.

सन १९५७–५८ साल असावे. मामा त्यावेळी उपचारार्थ डॉ. ए. के. तळवळकर यांचेकडे येत असत. त्यांचे नेमके दुखणे मला सांगता येणार नाही. पण फाशीच्या शिक्षेसारखा तो आजार होता एवढे खरे. मामांच्या पाठीतील मणक्याची हाडे चिकटल्यासारखी झाली होती व त्यामुळे त्यांना वेदना होत. त्या दूर व्हाव्या म्हणून मानेवर काही वेळ सर्व शरीराचा भार तोलून त्यांना उभे राहावे लागे. ते मालीशही करून घेत. या आजारातून ते काही दिवसांनी बरे झाले.

यानंतर त्यांना जो मोठा आजार जडला तो म्हणजे जलोदर किंवा कोलायटिस अशा स्वरूपाचा होता व तो त्यांना तीन–चार महिने भोवला. यावेळी मामा गिरगावात डॉ. देशमुख यांचे निवासस्थानी माडीवर एका स्वतंत्र खोलीत असत. आम्ही उभयता त्यांच्या समाचारासाठी गेलो होतो. थोडा वेळ बोलणे झाले. त्यावेळी ते जे बोलले ते थोडे आठवते. 'भावे शरीरभोग सोसलेच पाहिजेत. त्याची काळजी करून काय होणार ? तुम्ही वरचेवर समाचारासाठी येऊ नका. माझी प्रकृती सुधारत आहे. काही विशेष वाटले तर पत्राने कळवीन.' त्यांची ही समाधानी व शांतवृत्ती पाहून आम्ही थक्क झालो. डॉ. देशमुख यांच्या औषधयोजनेमुळे त्यांना बरे वाटले

सन १९६८ साली मामा आळंदी येथे आजारी पडले. तो त्यांचा शेवटचा आजार ठरला. मनात आले की, या आजारात त्यांना डॉ. देशमुख यांची औषधयोजना हवी होती. यावेळी मामा मात्र स्वतःचे असे राहिले नव्हते. पुण्यास त्यांचे कायमचे निवासस्थान. घर भाड्याचे.

भगिनी जिजीबाई कर्वे यांचेकडे सदैव मुक्काम (घरच म्हणा) पण त्या वैकुंठवासी झाल्यावर जागेचा प्रश्न उद्‌भवला. जिजीचे सुपुत्र ह. भ. प. लक्ष्मण अप्पा यांचे नावावर जागा झाली. भाडे मात्र मामाच भरीत. पण ही गोष्ट अप्पांना रुचेना. त्यांनी जागेचा ताबा मालकास दिला. मामा रामकृष्ण आश्रमात राहू लागले. तेथे धर्मात्मा श्री. बोडस मामांची सर्व व्यवस्था एखाद्या भक्ताप्रमाणे पाहू लागले.

मामा आजारी अवस्थेतच आळंदीहून आश्रमात आले. उपचार चालू झाले. ता. ९ जूनला त्यांना डॉ. वाय्. व्ही. फाटक यांच्या रुग्णालयात हलवण्यात आले. ता. १० जूनला मी पुण्यास गेलो. मला रुग्णालयाचा पत्ता माहीत नव्हता. आणखी असे कळले की डॉक्टर व परिचारिकांशिवाय कोणास भेटू देत नाहीत. मग नाइलाजाने पुणे स्टेशनवरील टपालाचे पेटीत मामांना आंतर्देशीय पत्र टाकले व सरळ कल्याणला आलो.

मामांच्या प्रकृतीसंबंधीं मनात सारखे औत्सुक्य होतेच. इतक्यात त्यांचेच आंतर्देशीय पत्र आले की, तुम्ही उभयता भेटीस आल्यास आनंद होईल. हे पत्र हीच आज्ञा समजून उभयता त्वरित पुण्यास गेलो. डॉ. फाटक यांच्या रुग्णालयाचा शोध घेतला. तेथे गेलो, मामांचें दर्शन मात्र दुरूनच झालें. प्रकृतीस त्रास होऊ नये म्हणून भेटी-गाठी बंद केल्या होत्या. त्यामुळे मामांचे दुरून झरोकावजा काचेच्या गोल भिंगातून दर्शन घेऊन समाधान मानलें. कल्याण येथे न परतता उभयता आळंदीस जाऊन राहिलो. हेतू हा की मामांचे सन्निध असावे. अधून-मधून (एक दिवसाआड) पुण्यास येत होतो व त्यांचे दुरूनच दर्शन घेत राहिलो.

आषाढ शु॥ १४ स मामांचें निर्याण झाल्याचे समजताच लगेच डॉ. फाटक यांच्या रुग्णालयात गेलो. तळमजल्यावर त्या पुण्यात्म्याचे कलेवर ठेवलें होते. त्याला तीन प्रदक्षिणा घालून वंदन करून आळंदीस परतलो. आळंदीस दहनसंस्कार होणार होता. अन्त्यसंस्काराची जागा निश्चित केली.

दुसरे दिवशी म्हणजे आषाढ शु॥ १५ (गुरुपौर्णिमेस) सायंकाळी

५ चे पुढे अन्त्यसंस्काराची वेळ ठरली होती. पुण्याहून रावसाहेब नेऊरगावकर, ह. भ. प. गोपाळबुवा रिसबूड वगैरे मंडळी तासाच्या अंतराने येऊन पोहोचली. त्यांनी निश्चित केलेली जागा थोडा बदल करून पसंत केली. त्यानंतर जागेची स्वच्छता, लाऊडस्पीकर योजना, पाऊस आला तर चिता विझू नये म्हणून व्यवस्था इत्यादी कामे केली.

गुरुवर्य मामांची महायात्रा पुण्याहून भर पावसात आळंदीस आली. हजारो भक्तजन यात्रेत सामील होते. टाळ-मृदुंगाचा गजर व भजने अखंड चालू होती. यात्रा आळंदीस पोचण्यास उशीर झाला. सूर्यास्ताची वेळ येऊन ठेपली. त्यातून पावसामुळे अन्त्यसंस्काराची सर्वांना घाई झाली होती. आळंदीकर मात्र सेवेला अंतरले. अखेर चंदन काष्ठांनी युक्त अशा चितेत मामांचा देह हा हा म्हणता अदृश्य झाला. मामांची ती सदेह, सतेज, सात्त्विक मूर्ती अनंतात विलीन झाली. आता कोणालाही ती मूर्ती दिसणार नाही.

गुरुवर्य मामांचे आजारात डॉ. फाटक आणि डॉ. आर. व्ही. साठे आदी निष्णात डॉक्टरांनी त्यांना वाचविण्याची पराकाष्ठा केली. शुश्रूषा चालू असताना मामा शांत असत. त्यांना संकोच होई. आपले गुरुवर्य जोगमहाराज यांच्याप्रमाणे आळंदीत मृत्यू यावा व तिथेच अन्त्यसंस्कार व्हावा अशी त्यांची इच्छा होती. पैकी पहिली सफल झाली नाही. मामा पुण्यनगरीत, त्यांच्या आवडत्या पुणे शहरात वैकुंठवासी झाले. त्यांची दुसरी इच्छा त्यांच्या भक्तांनी पुरी केली. श्रीज्ञानेश्वर माऊलीच्या नि गुरू विष्णुबुवा जोगमहाराज माउलीच्या सन्निध देहाचे अंतिम विसर्जन झाले. इंद्रायणीतीरी हा महान भगवद्‌भक्त पुण्यात्मा पंचतत्त्वांत विलीन झाला.



## साधना – भक्ती – सिद्धी

समचरण सरोजं सान्द्र नीलम्बुदाभम्
जघन निहित पाणि मंडणं मंडणानाम्
तरुण तुलसि मालां कंधरं कंजनेत्रं
सदय धवलहासं विठ्ठलं चिंतयामि ।।

हे प्रकरण लिहीत असताना माझे डोळे पाणावत आहेत. अष्टसात्त्विक भाव उचंबळून आले आहेत. हृदय अतीव समाधानाने भरभरून गेले आहे. गुरुवर्य मामांची साक्षात विभूती डोळयांपुढे दर्शन स्वरूपात तरळत आहे. लिहू की नको असा संभ्रम पडला आहे. मी स्वत:लाच विचारतो आहे, 'अरे तू कोण ? स्वत:ला तरी जाणून घेतले आहेस का ? एक ना दोन, असे अनेक संदेहरूप प्रश्न चित्त विचलित करीत आहेत. त्यामुळे लेखणी अल्पकाल थबकते, विसावते. पण लगेच गुरुवर्य मामांचे स्मरण होते. ते प्रेरणावजा आदेश देतात– 'भावे, पांगुळले होऊ नका. जे काही विचार मनात येत असतील ते शब्दांकित करा.' या आदेशानुसार आता मी जे काही वेडेवाकडे लिहीत आहे ते माझे बोल नसून "बोलविता धनी वेगळाच" आहे असे समजून वाचकांनी हे माझे विचार समजून घ्यावेत ही सविनय प्रार्थना आहे.

गुरुवार श्रावण शुद्ध एकादशी शके १८६८ ता. ८ ऑगस्ट १९४६ या दिवशी मी माटुंगा (मुंबई) येथे मामांकडे गेलो होतो. प्रत्यक्ष जप करण्याचा आरंभ शुक्रवार ता. ९–८–४६ पासून झाला. कीर्तनकेसरी नानाबुवा बडोदेकर यांची कीर्तने मी पुणे येथे नू. म. वि. शाळेत शिकत असताना ऐकत आलो व त्यांच्याच घरी (राहाण्यास उतरत) गायत्री मंत्र घेण्याकरिता ७–८ दिवस जात होतो. अशा रीतीने एकशे आठ वेळा गायत्री मंत्र जपण्याची मला सवय लागली. त्यावेळी शरीर स्थिर ठेवण्याचा मी आटोकाट यत्न करीत असे. ती सवय "ॐ नमो भगवते

वासुदेवाय" या मंत्राचा जप करताना कामी (उपयोगी पडली) आली.

सकाळी स्नानसंध्या, देवपूजा झाल्यावर लगेच जप करीत असे पण आता व्रती नियम-नेम घेतलेला. त्यामुळे तासाचे वर दीड एक तास वेळ या कामास लागे. मी शाळाप्रमुख असल्यामुळे घरी निरनिराळ्या माणसांची नित्य ये-जा असे. माझ्या अर्ध्या-पाऊणतास जप-साधनेत मुलांनी व इतर कुटुंबियांनी व्यत्यय आणू नये अशी माझी इच्छा असे. त्यासाठी मी सकाळी ९ नंतर भेटी-गाठी होतील असा बोर्डही दारावर लावला. पण घरच्या लोकांना ह्या त्रास, सासुरवास वाटू लागला. येणारी जाणारी मंडळी असंतुष्ट होऊ लागली. मनाची एकाग्रता ढळू लागली. सारखे विक्षेप होऊ लागले. अखेर मी मामांचा सल्ला विचारला. त्यांनी विचारणा केली, "तुम्ही जप केव्हा करिता ? कोठे करिता ? कसा करिता ?" मी नम्रपणे सांगितले, "संध्यापूजा झाल्यावर देवासमोर बसूनच जप करतो."

"मग तुम्ही अद्यापि सगुण मनोहर विठ्ठलाची तसबीर घेतली नाही काय ? नसली घेतलीत तर आधी घ्या. जपसाधनेसाठी तुमच्याकडे स्वतंत्र खोली आहे का ?"

माझेकडे भाड्याने घेतलेल्या घरात पाच खोल्या होत्या. तीन वरच्या माडीवर व दोन खाली. त्यामुळे मी त्यांना म्हणालो, "जागा तशी मोठी आहे. जपासाठी स्वतंत्र सोय करता येईल." त्यावर मामा म्हणाले, "मग असे करा. स्वतंत्र खोलीतच उपासना, जप करीत जा. श्री पांडुरंगाची तसबीर समोर ठेवून आसनावर बसा व एकाग्रपणे जप करीत राहा. एकनाथमहाराजांनी भागवतात सांगितले आहे त्याप्रमाणे बसण्याचे आसन ठेवा."

मामांच्या उपदेशाप्रमाणे मी लाकडाचे चौरंगापेक्षा उंच असे एक आसन तयार करवून घेतले. त्यावर दर्भासन-लोकरीचे आसन व धावळी (पांढऱ्या लोकरीची) घालून त्यावर बसून जप करू लागलो. त्यामुळे पायाला रग लागेनाशी झाली व मुंग्याही येत नाहीशा झाल्या. समोर पांडुरंगाची तसबीर रुंद पट्टीवजा तयार करवून घेतलेल्या फळीवर भिंतीच्या आधाराने ठविली. पुढे निरांजन, उदबत्तीचा सुवास, बुक्का,

तुळसीमणी जपाची माळ अशा पवित्र थाटात म्हणाना मी जप करू लागलो.

सकाळी देवपूजा आटोपून, माडीवर खोली बंद करून मी जप करीत असे. आणि तरीसुद्धा अधूनमधून विक्षेप होईच. कोणीतरी दारावर टकटक करी तर कोणी हाका मारी. मामांना पुन्हा विचारले, "जपाची वेळ बदलली तर चालेल का ? पांडुरंगाच्या ध्यानावर दृष्टी एकाग्र करावयाची, आणि नित्य नवी अनुभूती मिळवावयाची, व्यत्यय तर येता कामा नये ! काय करावे ?"

मामा म्हणाले, "स्नान–संध्या, पूजा झाल्यावरच जपास बसले पाहिजे असे नाही. रात्री पहिली झोप झाल्यावर उठावे. चूळ भरून व हातपाय धुऊन शक्यतो बसावे. निदान दोन्ही डोळयांना व दोन्हीं पायांच्या आंगठयांना पाणी लावावे. पांडुरंगाचे तसबिरीचे दोन्ही बाजूस दोन उदबत्ती घरे ठेवून उदबत्त्यांचा मंद सुवास नि प्रकाश (अग्निकण) निर्माण करावा. दिवा शक्यतो नसावाच (फार तर नाइट लॅम्प), निरांजन, समई वगैरे दीप लावू नये. ही मध्यरात्रीची वेळ निवांत असते. व्यत्यय येण्याचा प्रश्नच नाही. मामांच्या या आदेशानुरूप मग मी जप करीत राहिलो.

आता मात्र पांडुरंगाची तसबीर म्हणजे प्रत्यक्ष मूर्तिमंत प्रभू पांडुरंग. तो तसबिरीत अवतरला आहे अशी श्रद्धा ठेवूनच मी जपाला बसत असे. गुरुवर्य मामांना अभिप्रेत असलेले दोन तीन अभंग देतो. श्री ज्ञानेश्वर माउलींचे–

१. सत्य ज्ञानानन्त गगनाचे प्रावर्ण ।
नाही रूपवर्ण गुण जेथे ॥१॥
तो हा देखिला (रे श्रीहरी) पाहिला डोळे भरी ।
पाह ते पाहणे दुरी । सारोनियां ॥२॥
ज्ञानदेव म्हणे, ज्योतिची निज ज्योती ।
ते हे उभी मूर्ती विटेवरी ॥३॥

२. तुज सगुण म्हणो की निर्गुण रे ।
सगुण निर्गुण एकु गोविंदु रे ॥१ ।

अनुमानेना अनुमानेना ।
श्रुति नेति नेति म्हणती गोविंदु रे ॥२॥
तुज स्थूळ म्हणू की सूक्ष्म रे ।
स्थूळ सूक्ष्म एकु गोविंदु रे ॥३॥
तुज आकारु म्हणो की निराकारु रे ।
आकारु निराकारु एकु गोविंदु रे ॥४॥
तुज दृश्य म्हणो की अदृश्य रे ।
दृश्य अदृश्य एकु गोविंदु रे ॥५॥
निवृत्ति प्रसादे ज्ञानदेवे बोले ।
बाप रखुमादेवीवरु विठ्ठलु रे ॥६॥

श्री तुकोबाराय यांचा नेहमीच प्रचारात असलेला अभंग–

सुंदर ते ध्यान उभे विटेवरी ।
कर कटावरि ठेवुनिया ॥१॥
तुलसीहार गळां कासे पीतांबर ।
आवडे निरंतर हेचि ध्यान ॥२॥
मकर कुंडले तळपती श्रवणी ।
कंठी कौस्तुभमणी विराजित ॥३॥
तुका म्हणे माझे हेचि सर्व सुख ।
पाहीन श्रीमुख आवडीने ॥४॥

या अभंगात वर्णिल्याप्रमाणे श्री पांडुरंगाचे दर्शन त्याच्या तसबिरीत होते व तसे झाले पाहिजे. शुचिर्भूत होऊन मी तसबिरीपुढे बुक्का वाहून श्रद्धापूर्वक अंतःकरणाने जप करू लागलो. आता कसलाच प्रतिबंध नव्हता. श्री पांडुरंगाचे तसबिरीवर दृष्टी खिळलेली. मनात इतर कसलेही विचारतरंग येऊ नयेत असे निकराचे यत्न चालू होते.

पण इतके यत्न करूनहीं कधीकधी निराशा डोकावे. अशा वेळी स्वामी रामकृष्णांचे अनुभूतीचे बोल धीर देत. एके दिवशी माझे चित्त हरपल्यासारखे झाले. तदाकारवृत्ती स्फुरली. किती वेळ तें सांगणे कठीण. पण गडबडलो. जपमाळ खाली पडली आणि ही अनुभूती गुरुवर्य मामांना कळविली.

येथे एक गोष्ट ध्यानात येईल की, उपासनेचा हा प्रकार म्हणजेच भक्ती. भक्तीकरिता उपास्यदैवत (लिहू का सगुण) लागते. या ठिकाणी प्रभू पांडुरंग ही उपास्यदेवता छायाचित्ररूपाने उपस्थित आहे व जप करताना साधक हा भक्त आहे. पांडुरंगाची सगुण मूर्ती प्रत्यक्ष हृदयात वास करीत आहे अशी भावना जप करिताना झाली पाहिजे. गुरुवर्य मामांना या अशाच आनंददायी अनुभूतीविषयी व इतर विक्षेप करणाऱ्या गोष्टींविषयी विचारले व मार्गदर्शनाची विनंती केली. यात अडचण दोन प्रकारची येत होती

१) द्वादशाक्षरी मंत्रजप

२) मोजणी.

आता जपमंत्र रोज करीत असल्यामुळे सवय म्हणतात ती अंगवळणी पडली होती. जप करिताना वेग वाढत होता. त्यामुळे जपमाळ संख्या (दक्ष) कमी वेळात होत होती की काही मंत्रांमधील अक्षरे अनुच्चारित राहून लौकर होतो की काय ते समजेनासे झाले. प्रथम प्रथमच जप वैखरी म्हणजे शब्दोच्चार करून करीत होतो. पुढे मनातल्या मनात करू लागलो. तो करीत असताना (अनु) उच्चार ध्वनी ऐकू येऊ लागला. या प्रत्ययाबाबत नामदेव महाराजांचे रोजच्या पाठातील एक अवतरण देतो.

अनुहात वाजती टाळ । अनुक्षीर गीत रसाळ ।
अनुभव तन्मय सकळ । नामा म्हणे केशव कृपाळू ॥

त्यामुळे संभ्रम– संशय– हे एक

२) जर एकाग्रता– टक लावून तल्लीन होण्याचा प्रयत्न तर दहा माळा किंवा एक हजार वेळेला जप याकडे अनुसंधान हे ठेवावे लागणारच. तर मेळ किंवा अनुसंधान कोठे ठेवावे ?

गुरुवर्य मामांनी याबाबतीत मजवरील एक बंधन सैल केले. "तुमच्या अनुभवाला येणाऱ्या गोष्टी सहज आहेत. ध्यानाला बसताना आरंभी जपमाळ घ्यावी. पण मोजणीचे बंधन नको. ध्यान, तन्मयता यावर लक्ष केंद्रित करा. साधारणपणे १५–२० मिनिटे तरी आसनस्थ राहा" या खुलाशामुळे आता जप, ध्यान तर रात्री समाधान होईतो करीत होतो.

जागा झालो की ध्यानाला बसू लागलो. जणू ध्यासच लागला. असा हा छंद म्हणजेच निष्काम प्रेमभक्ती. व्यवहारातले प्रेम सकारण असते. पुत्र, कन्या, स्त्री हे या प्रेमाचे विषय. त्यांचे संगोपन, शिक्षण, आरोग्य ही कर्तव्ये मनुष्याला सोडता सोडवत नाहीत. मन चिंतायुक्त असते. उदरनिर्वाहापुरता पैसा जरी मिळत असला तरी समाधान असते का ? पैसा हा कष्टसाध्य की दैवलिखित आहे हेच माणसास कळत नाही. तुकाराममहाराज म्हणतात–

**प्रारब्धेंची जोडे धन । प्रारब्धेंची वाढे मान ॥१॥**
**सोस करिसी वाया । भज मना पंढरिराया ॥२॥**
**प्रारब्धेंचि होय सुख । प्रारब्धेंचि पावे दुःख ॥३॥**
**प्रारब्धेंचि भरे पोट । तुका करिना बोभाट ॥४॥**

जप-ध्यानाचा हा छंद मला जडला तेव्हा रात्रीतून किती वेळा जागे व्हावे व पुन्हा जपाला बसावे याला सुमार नव्हता. ध्यान जपाला किमान १५–१२ मिनिटे बसले पाहिजे असा आदेश होता. कित्येक वेळेला हे जमत नसे. जांभया येत. लक्ष स्थिर करणे कठीण होई. तेंव्हा गुरुवर्य मामा म्हणाले, “ भावे, हे चांगले आहे. पण जांभई येऊ लागली की सरळ झोपत जा.”

पुढे पुढे असे होऊ लागले की जप-ध्यानाला बसले की, पुढचातील श्री विठ्ठलाचे मुख दिसेनासे होई व केवळ प्रकाशमान अशी स्थिंती त्या ठिकाणी प्रत्ययास येई. हा भास वारंवार होऊ लागला. तेव्हा गुरुवर्य मामांना कळविले, त्यांचेकडून शाबासकी मिळाली.

आता आणखी हुरूप येऊन मी जप-ध्यानाला बसू लागलो आणि काय आश्चर्य मी माझे ठिकाणी हसत आहे, खिदळत आहे, एक-दोनदा तर आनंदमग्न स्थितीत नाचत आहे असाच भास होऊ लागला. ही नवी अनुभूती मामांचे कानी घालताच त्यांना आनंद झाला व ते मजवर प्रसन्न झाले.

दीक्षामंत्र घेण्यापूर्वी मी दत्तजयंतीनिमित्त श्रीगुरुचरित्र पारायण (७ दिवस) व दासनवमीनिमित्त श्रीदासबोध पारायण (९ दिवस) करीत होतो; दीक्षामंत्र घेतल्यावर एकदा श्रावण वद्य १ ते श्रावण वद्य ८

– श्रीकृष्ण जयंतीपर्यंत प्रतिवर्षी श्रीज्ञानेश्वरी पारायण व गीता आणि प्रति मे महिन्यात एकनाथी भागवत पारायण करीत राहिलो व अद्याप करीत आहे.

सप्ताह–पारायण प्रसंगी काही आचरण हे करावे लागतेच. पवित्र घोंगडीचे आसन आणि स्त्रीसंगवर्ज्य ही पथ्ये पाळावीत असा संकेत आहे. पण साधना करू लागल्यापासून कामवासना प्रदीप्त होऊ लागल्या, आवर घालणे कठीण झाले. त्यामुळे अल्पकाळ गोंधळून गेलो. एकदा पारायण करीत असताना कामवासना प्रदीप्त होऊन बेचैन झालो. उठून फेऱ्या मारू लागलो. पत्नीने विचारले, "असं काय करायचं ?" पण मीच उलट रागावलो. गुरुवर्य मामांना पत्र लिहून व्यथा कळविली. "व्रती राहा. हीही एक अवस्था येते– चांगले लक्षण आहे."

श्रावण शु।। ११ म्हणजे अनुग्रह तिथी. जयंती. या दिवशी काय करावे म्हणून गुरुवर्य मामांकडे पृच्छा केली. त्यांना लिहिले, "तीन हजार जप व आचार्योपासनेवरील श्री ज्ञानेश्वरी माउलींच्या ओव्या मीं वाचणार आहे व श्री चांगदेव पासष्टी चिंतनाकरिता एखादी ओवी वा काही तरी मिळावे." त्यावर त्यांचेकडून चिंतनाकरिता ओव्या आल्या– पण आज दोनच स्मरत आहेत.

१) तेवि सद्‌भ्यासे निरंतर । चित्तासी परमपुरुषाची मोहर ।
लावी मग शरीर । असो वा जावो ।।

२) सखया (चांगया) तुझेनि उद्देशे । भेटावया जीव उल्हासे ।
परि सिद्ध भेटी विसकुसे । ऐशिया बिहे ।।

अशी साधना– उपासना चालू असताना एकदा मे महिन्यात मी नामदेव मंदिरात (पंढरपूर) राहात होतो. महाजन तेथील व्यवस्था पाहात असत. गुरुवर्य मामांनी चिठ्ठी दिली होती. श्रीनाथभागवताचे पारायण खुद्द मंदिराचे गाभाऱ्यात वरील बाजूस चालू होते. पारायणाचा तिसरा दिवस होता. अध्याय १४ वा. त्यात भगवान श्रीकृष्ण आपल्या स्वरूपाचे वर्णन भक्तश्रेष्ठ उद्धवाला सांगत आहेत. तो प्रसंग. त्यावर नाथरायांनी केलेले स्वरूपवर्णन वाचीत असता रोमांच उभे राहिले.

तेचि माझे मूर्तीचे ध्यान । उद्धवा ऐक सावधान
आपुले मूर्तीचे आपण । ध्यान श्रीकृष्ण सांगत ।। अ. १४-४७०
अति दीर्घ नाठें गणेपण । सम अवयव समान ठाण
सम संतोष अति संपूर्ण । मूर्ती सुलक्षण चिंतावी ।। अ. १४-४७१

प्रत्यक्ष भगवंताची सगुण मूर्ती नाथरायांनी वर्णन केलेली डोळ्यां-पुढे उभी राहिली. वेळ सायंकाळी साडेपाच-सहा असावी. डोळ्यावाटे आनंदाश्रू वाहू लागले. पोथीपारायण मग बंद केले व चंद्रभागेवर जाण्यापूर्वी गुरुवर्य मामांना पत्राने ही अनुभूती कळविली.

इवलेंसे रोप लावियेले द्वारी ।
त्याचा वेलु गेला गगनावरी ।।१।।
मोगरा फुलला मोगरा फुलला ।
फुले वेचिता अति भारु कळियासी आला ।।२।।
मनाचिये गुंती गुंफियेला शेला ।
बापरखुमादेवीवरु विठ्ठली अर्पियेला ।।३।।

मोठे सार्थक झाल्यासारखे वाटले. गुरुवर्य मामांकडून दीक्षामंत्र घेतला आणि उपासना-साधनामार्ग आचरून त्यातून ही अनुभूती मिळविली. त्यातच एका जाणिवेची भर पडली. जे जे बोलावे तें ते होऊ लागले. जणू वाचासिद्धी प्राप्त झाली. पण त्या योगे समाधान पावण्याचे ऐवजी मी घाबरून गेलो. गुरुवर्य मामांना मनाची ही अवस्था प्रांजल-पणे लिहून कळविली.

विद्यापीठ देखील म्हणते की तुम्ही एम. ए., पीएच. डी. (डॉक्ट-रेट) झालात. आता आमचे विद्यापीठात या विषयापुरती पूर्णता झालेली आहे. माझे तसेच काहीसे झाले आहे. जपध्यान धारणेस बसलो की, जवळजवळ लगेच तन्मयता, अनन्यता येते. साहजिकच आनंद निर्भर होतो. त्यामुळे जप वगैरे राहून जातो. भान पण नसते. तर आपण दिलेली जपसंख्या व इतर साधना यांची पूर्ती होणारच नाही का ? स्थितप्रज्ञ भक्ताचीं लक्षणे केवळ वाचून समजून घ्यावयाची ! अनुभव वा प्राप्ती कधीं नसतेच का ?

यावर गुरुवर्य मामांचे पत्र आले ते फार प्रांजळ व बोलके होते.

" भावे, आता तुम्ही अशा पातळीवर–भूमिकेवर आला आहात की, जप–ध्यान–धारणा नाही केलीत तरी चालेल. आता पंचपदी भजन इत्यादी करावी व शक्यतर साधना चालू ठेवावी. " मला यामुळे फारच धन्यता वाटली.

आजि संसार सुफळ झाला गे माये ।
देखियले पाय विठोबाचे ।।१।।
तो मज व्हावा तो मज व्हावा ।
वेळो वेळा व्हावा पांडुरंग ।।२।।
बाप रखुमादेवीवरु न विसंबे सर्वथा ।
निवृत्तीने तत्त्वता सांगितले ।।३।।

आता यापुढे उपासना करीनासे झालो. वरील सर्व अनुभूती दीक्षामंत्र घेतल्यावर ५–७ वर्षातील आहेत. पुढे एक प्रकारे केवळ वारी–आषाढी–कार्तिकी पंढरपूर व कार्तिक वद्य पक्षात आळंदी इत्यादी करीत होतो. वयाला ६१ वे वर्ष लागले तेव्हा गुरुवर्य मामांच्या अनुमतीने कोणती तरी एक वारी ठेवावयाची आहे. आता वय झालेले. तेव्हा मामा म्हणाले, " पालखीच्या रूपाने सकल संत आषाढी वारीला पंढरपुरास येतात. तर ही वारी ठेवा." त्याप्रमाणे करीत राहिलो.

अनुग्रह तिथी दिवस जयंती प्रथम काही वर्षे देहू येथे श्री तुकाराम-महाराजांचे दर्शनाने साजरी केली. पण पुढे मला समजले की, गुरुवर्य मामा माधवबागेत श्रावणमासी कीर्तन–प्रवचन करवीत असतात तेव्हा आम्ही उभयता मुंबईस मूळजी माधवजी धर्मशाळेत त्यांचेकडे जात असू व दर्शन घेत असू. एकदा ते पुणे येथे आजारी असता दर्शनास आम्ही उभयता आळंदीस गेलो व एकादशीला पुणे येथे रामकृष्ण आश्रमात जाऊन मामांचे दर्शन घेतले. माझ्या जीवनातील ती व्यासपूजाच होती. पुढील वर्षी पुण्याला असेच गेलो तेव्हा ते पंढरपूर येथे गेल्याचे समजले. मन विषण्ण झाले. आसवे गाळून दुःख, निराशा निपटून काढली. गुरुवर्य मामांना पत्र लिहून जीव हलका केला व कल्याणला परतलो. त्यांचे उत्तर आले ते आज नीट आठवत नाही. पण आशय असा होता. " तुमची भावना मी समजू शकतो. या दिवशीच भेट घेणे म्हणजे गुरु-भक्ती नव्हे. तेव्हा विचार करा व चिंतनात राहा. "

यानंतर गुरुवर्य मामांचा वैकुंठवासच आषाढ महिन्यात झाला. गुरुवर्य मामा आजारी म्हणून पुण्यात. आम्ही उभयता पुणे येथे रुग्णालयात जाऊन दर्शन घेतले. हेच पंढरपूर. आषाढी वारी न घडलेली. मार्गदर्शनाकरिता पूज्य धुंडामहाराज यांना पत्र लिहिले. त्यांचा आदेश "तुमचा अनुग्रह तिथी दिवस श्रावण शु॥ ११. तो तुम्ही मामांचे दर्शन घेऊन पाळताच. तर यापुढे श्रावण शु॥ ११ पंढरपूर येथे जा. गुरूचे ठिकाणी पांडुरंगाचे दर्शन घ्या व यापुढे हाच क्रम चालू ठेवा."

श्रमसाफल्य होऊन आता समाधान आहे. अजून कितीतरी अनुभूती अगम्य राहिलेल्या आहेत. कारण "कासयाने पूजा करू" ही जाणीव अनुभूती नाही. "अनंत रूपे अनंत वेषे देखिले म्या त्यासी" ही पण नाही. पण एक गोष्ट मात्र माउलींचाच अभंग प्रमाण देतो.

मन हे राम झाले,
प्रवृत्ति ग्रासूनि कैसे निवृत्तीसी आले ॥१॥
श्रवण कीर्तन केले विष्णु स्मरण केले
अर्चन वंदन दास्य सख्य आत्मनिवेदन केले ॥२॥
यम नेम प्राणायाम प्रत्याहार संपादिले
ध्येय धारण आसन मुद्रा कैसे समाधीस आले ॥३॥
बोधि बोधले तत्त्वता कळों ऐसे आले
माझे मी पण हरपले ॥४॥

एक भाग राहून गेला. प्रति श्रावण शु॥ ११ नंतर पण नारळी
पौर्णिमेच्या आत एक अर्पणपत्र पाठवीत असे. त्यात वार्षिक सिंहाव-
लोकन करी. अलीकडे माझा जीवनक्रम म्हणजे उपासना बंद. सांसारिक
नोकरी– अडचणी निवारण्यातच वेळ जात होता. त्यामुळे वार्षिक व्रते,
सप्ताह, पारायणे व वारी एवढीच करीत होतो. गुरुवर्य मामांचे ध्यानी
हे आले होते. त्यांचेकडून माझे डोळे उघडावे, मी उपासना (पुन्हा)
प्रवण व्हावे असे शेवटचे पत्र लिहून आले म्हणाना. हे पत्र मिळाल्या-
पासून मी विषण्ण होतो. गुरुवर्य मामांचे मन राजी व्हावे अशा यत्नात
होतो. पण ते आजारी पडले व त्यांचा जीवनग्रंथ आटोपला.

मामांच्या वैकुंठवासामुळे आता वडीलधारे छत्र उरले नाही.

त्यांनी दिलेले पाथेय हीच पुढील आयुष्याची शिदोरी. मामांच्या चिंतनात मी मग्न असतो. आता आयुष्याची संध्याकाळ सुरू आहे. केव्हा कोठे जाणार हे कळत नाही. पण ते जाणून यत्न करितो.

"हेचि दान देगा देवा, तुझा विसर न व्हावा" या प्रमाणातील दान आजही आहे. देवाचे स्मरण चिंतन सर्व काही चालू आहे. तेव्हा आता देहाची आसक्ती तर सुटावी आणि त्याजबरोबर मन उदासीन होऊ नये अशा स्थितीची वाट समाधान चित्त पाहात आहे.

जिणे देऊनि देही, निःशंक होइजे ।
म्या मरणे मरण तयासि म्हणिजें ॥१॥
जिणे ते काई मरणे ते काई ।
जिणे मरणे दोही चोजवेना ॥२॥
सिंधु बुडबुडा क्षणामाजी आहे ।
सिंधु बुडबुडा कधीच नाहे ॥३॥
बापरखुमादेवी– वरांच्या पायी ।
ज्ञानदेव पाहीं मरण जाणे ॥४॥

याप्रमाणे जगणे देहावर सोपवून सद्‌गुरु मामांच्या कृपाशीर्वादात धन्य होऊन राहावे एवढीच त्यांचे चरणी प्रार्थना आहे.

¤

# असे होते मामा

तो चालते ज्ञानाचे बिंब
तयाचे अवयव ते सुखाचे कोंभ
परि माणुसपणाची भान
लोकाचि भागु ।।

तो ज्ञानाची चालती मूर्ती आहे. त्याचे अवयव म्हणजे सुखाला फुटलेले अंकुर आहेत. परंतु (त्याचे ठिकाणी दिसणारा) माणूसपणा हा लोकांच्या दृष्टीला होणारा भ्रम आहे.

गुरुवर्य मामांचा सहवास मला २०–२२ वर्षे लाभला खरा. पण मी त्यांना पूर्णतः जाणून घेऊ शकलो ते यथामती शब्दांकित करतो.

गुरुवर्य जोगमहाराज कसे होते यासंबंधी मामांनी जे सांगितले ते आधी देतो–

"ते निष्कलंक ब्रह्मचारी होते, परममेधावी होते, थोडे थट्टेखोर होते, निर्लोभ होते, थोडे तापट होते, परमदयाळू होते, कडक शिस्तीचे होते, उज्ज्वल देशभक्त होते, उत्तम वक्ते होते आणि याहूनहीं पुष्कळ पुष्कळ होते. बोवांची गुणवत्ता अनाकलनीय होती असे म्हटले म्हणजे पुरे.'

गुरुवर्य मामांसंबंधी लिहिताना माझी स्थिती अशीच काहीशी झाली आहे, भावना उचंबळून येतात आणि लेखणी–वाणी थबकते. मामा लोकमान्य टिळक, महात्मा गांधी, पंडित नेहरू इत्यादिकांप्रमाणे देशभक्त नव्हते. परंतु स्वदेश, स्वधर्म, स्वभाषा, स्वदेशी यांचे अभिमानी होते. कॉलेजात प्राध्यापक अथवा प्राचार्य असताना त्यांचा वेश साधा असे. बूट पाटलोणवाल्यांचे त्यांनी अनुकरण केले नाही. भारतीय परंपरेला शोभेल असा पोषाख ते कटाक्षाने करीत. डोक्याला रुमाल

अथवा टोपी, लांब कोट, आतून सदरा, उपरणं आणि पातळ वाहाणा अशा पोषाखात नित्य वावरत.

लो. टिळक चिरोल खटल्यासाठी विलायतेला निघाले तेव्हा वै. जोगमहाराज यांनी एक शुभेच्छादर्शक अभंग रचिला व तो मामांकरवी लोकमान्यांकडे पाठविला.

**पुण्यं उभे राहो आता । संताचे याकारणे**
**लागा विलायतेच्या वाटे । तुम्हा भेटे स्वराज्य**
**संकल्प हे यावे फळा । कळवळा बहुतांचा**
**म्हणे ज्ञानदेव किंकर । तुमचा जयजयकार ।।**

१९५१ साली मामांना सेवानिवृत्तीचे वेळी मानपत्र दिले गेले. त्याप्रसंगी विद्यार्थिवर्गास उद्देशून त्यांनी जो संदेश दिला त्यावरून त्यांचे अंगी वसत असलेली राष्ट्रीय वृत्ती चांगली प्रकट होते.

खऱ्या शांतीचा लाभ ईश्वरावर ज्यांचा निष्ठावंत भाव असतो त्यांनाच होतो. अशी शांती ज्यांना लाभली तेच खरे कर्मयोगी होऊ शकतात. अशाच कर्मयोग्यांची आज राष्ट्राला गरज आहे. देव, देश व धर्म यांची निरलस व निःस्वार्थ सेवा करणारे कर्मयोगी विद्यार्थिवर्गातून निर्माण होण्यावर देशाचे उज्वल भवितव्य अवलंबून आहे.

पुण्यपत्तन — शं. वा. दांडेकर
९-६-१९५१.

एकदा काय झाले. श्रावण शु।। ११ होती. अनुग्रह तिथी. आम्ही उभयता माधवजी मूळजी धर्मशाळेत (मुंबईस) गेलो होतो. कॉफीपान झाल्यावर हॉलमध्ये आलो. गुरुवर्य मामा खुर्चीवर घरगुती पोषाखात–मलमलचा शर्ट घालून बसले होते. त्यांच्या दर्शनास एक भाविक आला होता. हार, गुच्छ, उदबत्ती, बुक्का इत्यादी घेऊन विचारा आला होता. प्रथम त्याने मामांना हार घातला व नंतर उदबत्त्या पेटवून तो जेव्हा ओवळण्याच्या बेतात आला तेव्हा मामा एकदम संतापले (कडाडले म्हणाना) व म्हणाले, "हे पाहा, मी मनुष्य आहे, देव नाही, उदबत्तीने ओवाळायचे ते देवाला, तेव्हा उठा." भोळा भाविक हिरमुसला. पण मामांनी नंतर त्याची विचारपूस करून परामर्श घेतला.

आणखी एक त्यावेळचा प्रसंग.

एक भाविक स्त्री मामांच्या दर्शनास आली. मामांच्या पायी माथा ठेवून तिला दर्शन हवे होते. त्याप्रमाणे त्या जवळ येऊ लागताच मामा दूर पाय करून म्हणाले, "दूरून दर्शन झाले आहे ना? मग उठा व आपल्या कामाला जा." बाईंना वाईट वाटले. (पायांचे) स्पर्श-दर्शन घेतल्याशिवाय जावयाचे नाही. ही तर जिद्द व्हरांड्यात थांबून राहिल्या. मामा बाहेर थोड्या वेळाने व्हरांड्यात जाण्याकरिता आले, बाई दत्त म्हणून पुढे उभ्या. मामा झणझणीतपणे त्यांना म्हणाले, 'जा बरं इथून' आणि तडक निघून गेले. बाईंचे यत्न विफल झाले. डोळे पाणावले.

मामा परमकारुणिक होते. उदाहरणे अनेक देता येतील. गोपुनाना वैद्य अर्धांगाने पीडलेले. पण त्यांचा भार मामांनी आईच्या ममतेने वाहिला. पालन–पोषण, औषधपाणी सर्व काही केले. विशेष म्हणजे ना नाते ना गोते. पण एकदा आपला म्हटला की त्यासाठी मामा झटत.

आळंदीला वै. जोगमहाराज शताब्दी सोहोळा मामांच्या मार्गदर्शनाखाली (१५, २० दिवस) थाटाने साजरा झाला. दर दिवशी यजमान वेगवेगळा (यालाच दिवस देणें). ते त्या त्या दिवशीचा खर्च करीत. एकदा काय झालं–एक सधन गृहस्थ आले व मामांना म्हणाले, "मला एक दिवस सेवेची संधी मिळेल का?" "मोकळा असेल तर विठ्ठलबुवांना विचारून या. मात्र शेवटचे दिवसापैकी घेऊ नका." ते गृहस्थ बुवांना भेटून आले व म्हणाले, "आहे एक दिवस. तुमच्याकडे मी तीन हजार रुपये दिले तर पुरतील काय?" मामा त्यावर त्यांना म्हणाले, "अहो, मी कॉन्ट्रॅक्ट घेतो असे तुम्ही समजता काय? तसे काही नाही. पुण्याहून काही सेवकवर्ग रोजंदारी देऊन येथे आणविला आहे. तेव्हा तुम्हाला ती काळजी नाही. तुम्ही भोजनाचे सामान बाजारातून आणा, धर्मशाळेत नेऊन द्या. उरतील ते पदार्थ तुम्ही घरी घेऊन जा किंवा भंडारा चालू आहे त्यात भर घाला. पैसा किती लागेल हे मी पाहात नसतो. मला पैसा असा नको. घेतही नसतो. तुम्ही स्वतः सर्व व्यवस्था

पाहा म्हणजे झाले. माझ्यापुरते विचाराल तर आजचे माझे जेवण त्यात आहे."

मामांची केवढी ही निरपेक्षता !

आणखी एक भावनात्मक व हृद्य आठवण-तत्त्वज्ञान विद्यापीठातील एक स्नेही प्राध्यापक दुपारी निरोप देतेसमयी मामांना म्हणाले, "मी काही रक्कम देऊ इच्छितो." मामा म्हणाले, "ठीक आहे. माडीवर विठ्ठलबुवा आहेत त्यांच्याजवळ रक्कम द्या व पावती घ्या." त्याप्रमाणे ते माडीवर गेले व त्यांनी २० रुपये विठ्ठलबुवांजवळ दिले आणि म्हणाले, "आता एक काम करा. पावती फाडण्यापूर्वी या दहाच्या दोन नोटांना मामांचा हस्तस्पर्श होऊ द्या." त्याप्रमाणे विठ्ठलबुवांनी खाली येऊन सांगितले. मामांनी त्या स्नेह्याची भावना ओळखून हस्तस्पर्श केला व शेवटी पैसे शिक्षणसंस्थेला द्या म्हणून सांगितले.

गुरुवर्य मामा कॉलेजात तत्त्वज्ञान विषय हा इतका समरसून शिकवीत की विद्यार्थ्यास त्याची गोडी लागावी. इतकेच काय पण ज्ञानाच्या गाभाऱ्यात नेऊन ते त्याची ज्ञानसमाधी साधून देत असत. कीर्तन–प्रवचने करताना बहुजन समाजाच्या मनी ते संताचा संदेश (शिकवण) रुजवत. पांडित्यापेक्षा त्यांची कळकळ मोठी असे. पूज्य माउलींच्या शब्दांत सांगायचे तर–

श्रुती स्मृतीचे अर्थ । आपणांचे होऊनि मूर्त ।।
अनुष्ठाने जगा देत । वडील जे ।।

याचा अर्थ, जगाचे वडील ही भूमिका मामा घेत. रस्त्यावरील खांबासारखे एके जागी उभे राहून कोरडा उपदेश (प्रकाश देण्यासारखा) त्यांनी कधी केला नाही तर–

जे पुरुषार्थ सिद्धी चवथी । घेऊनि आपुलिया हाती ।।
रिगाला भक्ती पंथी । जगा देतो ।।

गुरुवर्य मामा पुरुषार्थी सिद्धी लाभलेले बोधसंपन्न सिद्ध पुरुष होते व जगाला भक्ती मार्गास लावून मोक्ष प्राप्तीकडे नेत होते.

गुरुवर्य मामा व्युत्पन्न, मेधावी होते त्याचे प्रत्यंतर त्यांच्या ज्ञानेश्वरीच्या १४५ पृष्ठांच्या मार्मिक, स्फूर्तिदायक प्रस्तावनेवरून येईल.

शाश्वत विचारांची ही प्रस्तावना म्हणजे गाथाच आहे. ती वाचून सुशिक्षित मनुष्य अंतर्मुख होईल. मामा बालवयापासून निष्ठावान ब्रह्मचारी. ते व्रत त्यांनी शेवटपर्यंत अकलंक पाळिले. अमानित्व तर त्यांचा विशेष गुण होता. त्यांना ढोंग माहीत नव्हते. कीर्तनासाठी त्यांनी कधी पैसा घेतला नाही व तसा तो कोणीही घेऊ नय असे ते म्हणत असत.

ज्ञानदान हे पुण्यकर्म आहे. ज्ञान विकू नका अशीच त्यांची शेवटपर्यंत धारणा होती. मामांचे वर्तन कसे होते हे साधुवर्य तुकाराममहाराज यांच्या अभंगाचा दाखला देऊन स्पष्ट करतो.

कपट काही एक । नेणे भुलवायाचे लोक ॥
तुमचे करितो कीर्तन । गातो उत्तम ते गुण ॥
दास नेणे जडी बुटी । चमत्कार उठा उठी ॥
नाही शिष्य शाखा । सांगो अयाचित लोकां ॥
नव्हे मठपति । नाही चाहुरांची वृत्ती ॥
नाही देवार्चन । असे मांडिले दुकान ॥
नाही वेताळ प्रसन्न । काही सांगो खाणखूण ॥
नव्हे पुराणिक । करणे सांगणे आणिक ॥
नेणे वाद घटापटा । करिता पंडित करंटा ॥
नाही जाळीत मणदी । उदो म्हणोनि आनंदी ॥
नाही हालवीत माळ । भोवते मेळवुनि गबाळ ॥
आग मिचे कुडे नेणे । स्तंभन मोहन उच्चारणे ॥
नव्हे यांचा एकसा । तुका निरयासी पिसा ॥

गुरुवर्य मामा म्हणजे विचारांची शुचिता, उच्चारांची सुस्पष्टता आणि आचरणाची अकलंकिता यांचा सुंदर मेळ होता. सर्व लौकिक व्यवहार करताना मनाने ते निवृत्त असत. यामुळे त्यांना लोकसंग्रह करता आला व लोकशिक्षण देता आले. पैशानें जे समाधान विकत घेता येत असे ते मामांच्या सत्संगतीत लुटता येत असे. इतकेच नव्हे तर त्यांनी निर्मिलेल्या ग्रंथाभ्यासाने ते साधता येत असे. शुद्ध बुद्धी होण्याकरिता 'तुला यत्नशील व्हावे लागेल' असे ते सांगत असत.

गुरुवर्य मामा पुरुषोत्तम होते. ज्ञानापासून त्यांना खरी शांती लाभलेली होती. अविद्येपासून उत्पन्न होणारे कामक्रोधादि विकार त्यांना स्पर्श करू शकले नाहीत. लोकांना आश्चर्यभूत करणाऱ्या अणिमा, महिमा याबद्दल त्यांना कौतुक नव्हते. ढोंगबाजीविषयी त्यांना तिटकाराच होता. ज्ञानी असून रुक्ष नाही, भक्त असून अंध नाही असा त्यांचा पिंड होता. तर्कशक्ती, विवेचनशैली, प्रचंड पाठांतर हेही गुण निरंतरचे त्यांचे ठायी होते.

" पांथस्थ घरासी आला । प्रातःकाळी उठोनि गेला ।। "

या वृत्तीने गुरुवर्य मामांनी सारे आयुष्य वेचले व जीविताचे सार्थक केले. " विश्व स्वधर्म सूर्यें पाहो " या ध्येयासाठीच तें चंदनाप्रमाणे जगले व अखेर माउलींच्या सन्निध इंद्रायणीचे तीरी विसावले.

गुरुवर्य मामांचे एक असाधारण कर्तृत्व असे की, महाराष्ट्रातील अशिक्षित बहुजन समाजाला त्यांनी आपले मानले. त्या समाजाशी समरस होऊन त्यांनी संतांच्या उदात्त शिकवणुकीचा प्रसार केला. खादीचा कोट, अंगरखा, खादीचाच पांढरा शुभ्र फेटा, नि हाती तंबोरा अशा राजस वेशात ते कीर्तनास उभे राहिले की, सामान्य जन हेलावून जात. ज्ञानोबा तुकाराम म्हणजे ज्ञानभक्तीचा मंत्र. हा मंत्र मामांनी बहुजन-समाजाचे हाडीमासी रुजवला व एक प्रकारे सामाजिक ऐक्य साधलें. " सर्वभूती परमेश्वर ' हे अमर तत्त्व मामांनी आपल्या आचरणाने खरे करून दाखविले.

अनंत अनंत सश्रद्ध वंदन



# दीक्षा व मंत्रोपदेश

सन १९४३–४४ असावे. मी सपत्नीक मुलांना घेऊन नाशिक येथे पंचरत्नेश्वर मंदिरात होतो. एके दिवशी भल्या पहाटे स्वप्न पडले (दृष्टान्तच म्हणावा) प्रत्यक्ष प्रभू पांडुरंगाचे दर्शन. प्रभू आदेश देते झाले, "तू पंढरपुरास येऊन माझे दर्शन घे व नंतर आळंदीस जाऊन माउलींचे दर्शन घे म्हणजे समत्वदृष्टी प्राप्त होईल." या आदेशावर प्रथम विश्वास बसेना. म्हणून विचारले, "व्यवहारात समत्वदृष्टी पालन करता येत नाही. परीक्षेचे पेपर तपासताना वा निकालपत्र तयार करताना हे येत नाही. मग हे कसे शक्य आहे?' प्रभू म्हणाले, "करून पाहा: अशक्य ते शक्य होईल."

रजा संपल्यावर कल्याणला आलो. स्वप्नातील प्रभू–आदेश स्वस्थ बसू देईना. पण एक दिवस गुरुवर्य प्रा. सोनोपंत दांडेकर यांचे नाव आठवले व त्यांना प्रथमच पत्र लिहून मन:स्थिती कळविली. मनावरील दडपण कमी झाले. तुकोबाराय यांनीं अभंगात वर्णिल्याप्रमाणे स्थिती झाली.

कोणापुण्ये त्यांचा होईन सेवक ।
जिहीं द्वंद्वादिक दुराविले ॥१॥

ऐसे वर्म मज दावी नारायणा ।
अंतरीच्या खुणा प्रकटोनी ॥२॥

बहु अवघड आहे संत भेटी ।
तरी या जगजेठी करुणा केली ॥३॥

तुका म्हणे मन नये वृत्तीवरी ।
सुखाचे शेजारी पहुडेन ॥४॥

पूर्वपरिचय नसता मामांचे उत्तर आले, " विचार चांगले आहेत. प्रथम ज्ञानेश्वरीचे पारायण (वाचन) करा. " त्याप्रमाणे पूज्य साखरे-महाराजांची सार्थ ज्ञानेश्वरी प्रत विकत घेतली. तीन–चार महिने वाचनास लागले असावे. मोठे समाधान लाभलें. मग ७–८ दिवसांनी मामांना पुन्हा पत्र लिहिले. त्यांचेकडून लगेच उत्तर आले, " चांगली गोष्ट केलीत. आता सवडीने एकदा पंढरपुरास जाऊन या. "

मे महिन्याचे रजेत पंढरपूर येथे भाटे यांचे चाळीत (चौफाळा) बिऱ्हाड करूनच राहिलो. रोज सकाळी पांडुरंगरायाचे दर्शन, पूजावलोकन, नगरप्रदक्षिणा असा क्रम ठेविला होता. पांडुरंगरायांची अशी महिनाभर अवीट सेवा करून गहिवरल्या अंतःकरणानेच कल्याणला घरी आलो (परतलो). आल्यावर मामांना सर्व हकीकत कळविली व प्रार्थना केली की, आपणाकडे केव्हा येऊ ? मला दीक्षा व मंत्रोपदेश मिळेल काय ?

मामांचे यावर जे उत्तर आले ते म्हणजे वज्राघात ठरले. " मी मंत्रोपदेश देत नसतो. मला गुरु म्हणून कोणी संबोधावे, महाराज म्हणून माझी पूजा करावी हे मला बिलकुल अभिप्रेत नाही " हे उत्तर वाचून मी विषण्ण झालो. काही काळ भ्रमिष्टावस्था प्राप्त झाली.

दिवस जात होते. एके दिवशी संदेश मिळाला नि मामांना पत्र टाकले. पूर्वीचीच विनंती जरा विस्ताराने आणि आर्तपणे केली. आणि अनुकूल उत्तराची चातकाप्रमाणे वाट पाहत राहिलो.

ध्यानीमनी नसताना एक दिवस दुपारी गुरुवर्य मामा आणि प्रो. श्री. गो. हुल्याळकर अचानक दत्त म्हणून माझ्या घरी आले. मुंबई विद्यापीठाच्या सिनेट निवडणुकींसाठी प्रो. हुल्याळकर उभे होते. व मामा त्यांना मदत करीत होते. चहाफराळ झाल्यावर आम्ही कल्याण-मधील काही मतदारांना भेटलो. माझे भाग्य म्हणजे ४३ पदवीधर मतदारांपैकी ४१ जणांचे पहिल्या पसंतीचे मत प्रो. हुल्याळकरांना मिळाले. माझी ही अल्प सेवा मामांच्या ध्यानी आली. आम्ही जवळ येत चाललो. यानंतर आणखी एक प्रसंग घडला. मामांचे वडील बंधू (बाबुराव) दांडेकर खातेदार मतदार संघातर्फे मुंबई कौन्सिलची

निवडणूक लढवीत होते. मामांचे मला पत्र आले " मीं व बाबा सकाळी तुमच्याकडे येऊ. काही मतदारांकडे समक्ष जाऊ. दुपारी भोजन आपलेकडे करू, नंतर मी मुंबईस जाईन व बाबा अन्यत्र कार्यक्रम असेल त्यानुसार करील."

दोघे बंधु मजकडे आले, तेव्हाचा एक संवाद–

बाबा : सोन्या, आता तुझ्या खिशात ५० रु. आहेत का ?

मामा : नाहीत. पण भावे तुला देतील. नंतर त्यांचे परत कर.

त्याप्रमाणे झालेही. नंतर जाताना मामांना मी विचारले, "भेटीस केव्हा येऊ ?" "श्रावण शु ।।११ एकादशीस या." त्याप्रमाणे मी त्यांना विचारले व मामांनी त्यांचे मेहुणे श्री. फडके (माटुंगा) यांचा पत्ता मला दिला. मामांच्या होकारामुळे मी फार फार आनंदून गेलो. श्रावण शु।। ११ ची वाट पाहात राहिलो.

ठरल्याप्रमाणे व घरही माहीत असावे म्हणून आदले दिवशी श्रावण शु ।।१० बुधवारी गणेशबागेसमोरील रस्त्याने फडके यांचे घरी गेलो. सद्भाग्याने मामा पण तेथेंच होते. भेटीत विचारले, " उद्या केव्हा येऊ ?"

तेव्हा आज्ञा झाली, 'सकाळीच या. तुळशीमण्यांची माळ बरोबर घेऊन या.' मी हर्षभराने घरी आलो. कधी उजाडेल असे होऊन गेले. पहाट झाली. स्नान–संध्या, देवपूजा आटोपून सकाळी ६ च्या लोकलने माटुंगा गाठले व घरी गेलो. मामा कॉटवर पहुडलें होते. मला पाहताच उठले. आतून दोन पाट घेऊन आले. एक पोथी ठेवण्याकरिता व एक स्वतःकरिता. बासनात बांधलेली सार्थ ज्ञानेश्वरीची पोथी त्यांनी पाटावर ठेवली. मग मला म्हणाले, " भावे, तुमची तुळशीमण्यांची माळ आता या पोथीवर ठेवा." मी तसे करताच त्यांनी माळेवर बुक्का वाहिला, स्वतःचे कपाळी लावला व मग मलाही कपाळी लाविला.

" भावे, आता माळ उचला नि गळयात घाला."

त्याप्रमाणे घातली. नंतर माझ्याजवळ येऊन कानात द्वादशाक्षरी मंत्र सांगितला–

' ॐ नमो भगवते वासुदेवाय '

शेवटी उपदेशवजा बोलले, " भावे तुम्ही ब्राह्मण, तेव्हा खाण्या-पिण्याविषयी सांगायला नकोच. आता दहा माळा करीत जा. रोज काही ओव्या ज्ञानेश्वरीतील वाचा. कार्तिक वद्य ११ स आळंदीची वारी करीत जा. पंढरीची वारी सोयीची असेल तर ती करा. वर्षातून कोणत्यातरी ठराविक शु।। ११ स पंढरीची वारी न चुकता करा. " एवढे सांगून त्यांनी चहा दिला व जाण्यास सांगितले. मन अत्यंत प्रसन्न झाले. आनंद ओसंडत होता. सोनियाचा क्रांतिकारक दिवसच हा. प्रिन्सिपॉल नाना आक्षेकर यांचेकडे जाऊन त्यांना ही आनंददायी घटना सांगितली. मनाच्या तृप्त अवस्थेत तुकोबारायांचा अभंग आठवला.

(सत्य)

सद्‌गुरु राये कृपा मज केली ।
परी नाही घडली सेवा त्यांची ।।१।।
सापडविले वाटे जाता गंगास्नाना ।
मस्तकी तो जाणा ठेविला कर ।।२।।
भोजना मागती तुप पावशेर ।
पडिला विसर स्वप्नामाजी ।।३।।
काही कळे उपजला अंतराय ।
म्हणोनिया काय त्वरा झाली ।।४।।
राघव चैतन्य केशव चैतन्य ।
सांगितली खूण मालिकेची ।।५।।
बाबाजी आपुले सांगितले नाव ।
मंत्र दिला रामकृष्ण हरि ।।६।।
माघ शुद्ध दशमी पाहूनि गुरुवार ।
केला अंगीकार तुका म्हणे ।।७।।

# वारी पंढरीची नि आळंदीची

मामांच्या उपदेशाप्रमाणे उपासना करू लागलो. होताहोता कार्तिक शु. एकादशी आली. पंढरपुरास निघालो. मामा दत्तवाडकर यांना पत्र पाठविले होते. पण त्यांचे उत्तर आले नाही. वाट न पाहता पंढरपूर गाठले. गावात प्लेग होता. मामा दत्तवाडकर बांभूळ गाव येथे राहाणेस गेले असे समजले, गु. मामांचा शोध घेतला. ते कुंभारघाटावर देवधरांकडे उतरतात हे समजले. तिथे गेलो आणि सुदैवाने मामाच भेटले.

रात्रौ १२ वाजता मामांसह आम्ही चंद्रभागेवर स्नानासाठी गेलो. चांदणे अगदी कोजागिरीसारखे पडले होते. मामा स्नान करून आले. समर्थांप्रमाणे केवळ लंगोट घालून त्यांनी स्नान केले. मी जवळच उभा होतो. मामांची ती तेजःपुज अंगकान्ती पाहून थक्क झालो. एक अनुपम दर्शन. स्नान झाल्यावर आम्ही दहाबाराजण पांडुरंगाचे दर्शनास गेलो. लगोलग हरिपाठ म्हणत नगर प्रदक्षिणा केली व मग झोपी गेलो. पण काय सद्भाग्य ! रावसाहेब नेऊरगावकर मामांचे दर्शनास आले. त्यांचे जवळ सरकारी पूजेच्या दर्शनाचे दोन पास होते. मामांच्या आदेशावरून त्यांचेबरोबर सरकारी पूजेचा सोहोळा डोळा भरून पाहाता आला. आयुष्याचे सार्थक झाल्यासारखे वाटले. पुढील वर्षी मी स्वतंत्रपणे पास मिळविला व दरवर्षी तो सतत तसा मिळत राहिला.

पंढरपूरच्या या कार्तिकवारीत मामांना विचारले, "आता आळंदी यात्रेस येण्याचा विचार आहे. पण तिथे ओळखपाळख नाही, कोठे उतरावे ?" मामा म्हणाले, "वद्य ९ पासून काल्यापर्यंत मी आळंदीस असतो. वारकरी शिक्षण संस्थेचा पत्ता विचारा व तिथेच या, चिंता कसली ?"

त्याप्रमाणे दशमीचे सायंकाळी मी आळंदीस गेलो. तिथे पहाटपूजेस पास लागतो हे कळले. अनायासे वर्गमित्र नारायणराव झांझले

भेटले. काम झाले. ते पंच होते. पास मिळाला. दर्शन झाले. आता पास प्रतिवर्षी मिळतच आहे.

दुसरे दिवशी फराळ करण्याकरिता ती. स्व. जिजीकडे गेलो. रावसाहेब तिथे होतेच. एकदोन वर्षे असा योग आला. आळंदीहून निघण्यापूर्वी मामांना म्हणालो, 'मी येतो.' मन संकोची होते. मला अवघडल्यासारखें झाले होते. तेव्हा माउलींचे दर्शन (कळस) घेऊन परतींच्या मार्गास लागलो.'

पुढे पत्नी–मुलगा यांचेसह येतच राहिलो व मामांच्या सहवासात काळ घालवीत राहिलो. मामा पहाट पूजेसाठी कुटुंबाला व मुलाला दर्शन-पास देत असत. सन १९६० पर्यंत हा क्रम चालू होता.

१९६१ साली आमची 'प्रसाद' वास्तू उभी राहिली आणि आम्ही तिथे उतरू लागलो. ज्ञानेश्वर महाराजांच्या पुण्यतिथीपर्यंत आमचा आळंदीस मुक्काम असे. या वारीमुळें आणखी एक लाभ झाला. तो असा की नित्य वारी करणारे सुविद्य पदवीधर मुख्याध्यापक ह.भ.प. के. वा. भातखंडे (मुरबाड) आमचेकडे उतरू लागले. त्यांच्या सेवेचा लाभ मामांच्या कृपेमुळेच घडू लागला. जीवनात एक आगळा आनंद उत्पन्न झाला.



# मामांचा आशीर्वाद आणि प्रसाद

भगवद्भक्त अप्पामहाराज लेले हे कल्याणमधील पूज्य वारकरी संत. त्यांचा भव्य सत्कार व्हावा म्हणून काही भक्त मंडळी यत्नशील होती. या सत्कार सोहोळ्याचे निमित्ताने गुरुवर्य मामांचा कार्यक्रम व्हावा या हेतूने यत्न केला व त्यानुसार मामा आले. मामा येणारच होते. महामहोपाध्याय भाऊशास्त्री वझे हे तर सोहोळ्याचे अध्यक्षपदंच भूषविणार होते. तेव्हा या तीन थोर विभूतींची पाद्यपूजा मजकडून व्हावी या हेतूने मी दशग्रंथी वैदिकांना आमंत्रून सिद्धता केली.

गुरुवर्य मामा सकाळी १०–३० ला आले. त्यांनी चौरंग, पाट इत्यादी तयारी पाहून विचारले, "ही कसली तयारी ?"

"पाद्यपूजेची."

"कोणाच्या ?"

"म. म. भाऊशास्त्री वझे, उत्सवमूर्ती अप्पामहाराज व आपलीही व्हावी ही इच्छा." गुरुवर्य मामांना हा प्रकार रुचला नाही. खुंटीवरचे उपरणे खांद्यावर ठेवून तडक बाहेर जाण्यास निघाले. त्यांचे मन जाणून त्यांची पाद्यपूजा रहित केली.

पूज्यता डोळा न देखावी
स्वकीर्ती कानी नायकावी
हा आमुका होता ऐसी नोहावी
सेचि लोकां ॥ ज्ञा. १३–१८८

या ओळीचे प्रत्यंतर येऊन मामांचे अमानित्व ध्यानी आले. या प्रकारामुळे भक्तीचा मार्ग सोपा नाही हा बोध घेतला. त्यायोगे आचरण शुद्धी वाढली व काटेकोरपणा वाढला. खोटेपणा व लपवालपवी न करता आंतरिक मूल्य जोपासण्याचा यत्न करू लागलो.

तो काळ स्वातंत्र्य–संग्रामाचा होता. मी काँग्रेसवादी म्हणून सहकारी मला टाळीत असत. दिलासा एकच होता तो म्हणजे गुरुवर्य मामा यांचे अचानक पत्र आले " माघ शु।। १० ला इगतपुरीस कार्यक्रमास जावयाचे आहे. मी व ह. भ. प. विश्वनाथ बाबा पाटील, आधी तुमच्याकडे येऊ, भोजन करू व दुपारी इगतपुरीला जाऊ. " मी यावेळी मामांबरोबर प्रथमच तिथे गेलो. ह. भ. प. लक्ष्मणबुवांचा परिचय झाला.

यानंतर मामांकडून पुन्हा एक अवचित पत्र– " मी व प्रा. लट्टू व १५–२० मुले रात्रीचे येऊ. तुमच्याकडे भोजन घेऊन रात्रींचेच २–२।। च्या गाडीने पुण्यास जाऊ." मला अशा निमित्ताने मामांची सेवा घडे व आनंद होई.

कधी कधी कौटुंबिक सुखात आणि व्यवसायात संकटे येत. शिक्षण संस्थेचा मी आजीव सेवक. पदाधिकारी अडचणीत असत. सत्तेचा वापर करून मला लाचारीं पत्करायला लावीत. " जो पोषितो उदरासी । शरीर विकावे लागे त्यासी " अशी माझी स्थिती होई. पण मी आनंदी, निर्भय, बेफिकीर होतो. माझेविरुद्ध चारित्र्यहनन करणारे निनावी अर्ज केले गेले. काही सहकारी, अधिकारी यांनी विरुद्ध साक्षी दिल्या. मी डागळला जावा ही त्यांची आसुरी कांक्षा. पण सत्याचा पाठीराखा परमेश्वर असतो. गुरुवर्य मामा आणि काही स्वतंत्रवृत्तीचे सुहृद माझ्या पाठीशी होते म्हणूनच संकटाचे ढग पार वितळून गेले. हे होत असतानाच पुत्रनिधनाचे दुःख कोसळले. पत्नीची प्रकृती ढासळली. गुरुवर्य मामांनी

हे चि थोर भक्ति आवडते देवा ।
संकल्पावी माया संसाराची ।। १ ।।
ठेविले अनंते तैसेची राहावे ।
चित्ती असो द्यावे समाधान ।। २ ।।
वाहिल्या उद्वेग दुःखची कारण ।
भोगणे ते फळ संचिताचें ।। ३ ।।
तुका म्हणे घालू देवावरी भार ।
वाहू हा संसार देवा पायी ।। ४ ।।

मामांनी दिलेली शिकवण आठवून स्वतःच स्वतःचे सांत्वन करू लागलो. संकटाचा कळस म्हणजे संस्थाचालकांनी कल्याणहून माझी बदली केली व एक प्रकारे वृक्ष उपटून आसुरी समाधान मिळविले. अशा प्रसंगी मामांचे मार्गदर्शन हाच मला दिलासा होता.

गुरुवर्य मामांच्या सेवानिवृत्ती प्रसंगी पुण्यात रमाबाई हॉलमध्यें जो सत्कार झाला त्यावेळी मी हजर होतो. मामांनी घरी आल्यावर त्यांना भेट म्हणून मिळालेली सार्थ ज्ञानेश्वरी माझे हाती दिली. तिचे आकर्षक सोनेरी बाह्यांग पाहून मी आनंदित झालो. ती प्रत मुद्दाम स्वतंत्र ग्लेज कागदावर काढवून बाईंडिंग करून घेतली. रु. शंभरच्या वर खर्च आला असावा.

पुढच्या काळात मामांच्या भेटी दुर्मिळ होऊ लागल्या. एकदा माटुंग्याच्या रुईया कॉलेजात मामांचे "ईश्वरवाद" या विषयावर व्याख्यान होते. या व्याख्यानास त्यांनी मला बोलावून घेतले होते. हे व्याख्यान तसे पाहिले तर खूपच रंगले पण मी शेवटी परतताना विचारले, "श्रोतृवर्ग सारा सुशिक्षित होता. सर्वच महाविद्यालयीन विद्यार्थी व थोडा प्राध्यापक वर्ग. त्याला विचारप्रवण करण्याचे उद्दिष्ट साधले का ? स्पष्टीकरणार्थ आपण किती दृष्टान्त देता ? ते टाळता आले असते." यावर न रागावता मामा म्हणाले, "भावे, तुमचे म्हणणे काहीसे खरे आहे. पण मला वारकऱ्यांपुढे कीर्तन, प्रवचन करण्याची सवय. शक्य तितके सोपे करून सुगम व्हावे म्हणून बोलतो. आकाशवाणीवर बोलताना किंवा लेख लिहिताना मात्र मी काळजी घेतो."

७ मे १९५२ रोजी माझी पत्नी वारली व वज्राघात झाला. शाळेतून बदली झालेली, घरी चार मुले—सर्वांत धाकटी २ वर्षांची. अशी दारुण अवस्था. गुरुवर्य मामा समाचारास येऊन गेले. त्यावेळी मी त्यांना ही सारी सांसारिक कथाच म्हणाना सांगितली. मी व्रती होतो. स्त्रीसुखाचे बाबतीत उदासीन होतो पण मुलामुलींचे पोषण, रक्षण, शिक्षण या चिंतेने व्याकुळ झालो होतो. गुरुवर्य मामांनी माझी व्यथा ओळखून पत्र पाठविले. वडीलधारा व्यवहारी माणूस जसे लिहील तसेच ते पत्र होते. मी विवाह करावा असे प्रत्यक्ष न सुचविता पण केला

तरी हरकत नाही असा त्याचा मथितार्थ होता. माझ्या विवाहाला गुरुवर्य मामांचा आशीर्वाद लाभला. तो. स्व. बाबा (मामांचे वडील बंधू) विवाहास हजर होते. पत्नी सुशिक्षित, मिळवती. त्यामुळे उभयता वारीस जाऊ लागलो. त्यामुळे गुरुवर्य मामांच्या भेटीगाठीचा व मार्ग-दर्शनाचा मोठा लाभ होत असे.

शाळेतून मी निवृत्त व्हावे अशी परिस्थिती माझ्या हितशत्रूंनी निर्माण केल्यामुळे मी बेचैन होतो. मामांच्या करवी पदाधिकाऱ्यांस काही सांगण्याचा यत्न केला. पण त्यांनी 'विद्वान–पदवीधर माणसे सुसंस्कृत असतातच असे नाही,' असे मला समजाविले. व ते तटस्थ राहिले. मी त्यांना या बाबतीत पुन्हा शब्द टाकला नाही.

नोव्हेंबर १९५६ मध्ये कार्तिकवारीनिमित्त उभयता प्रतिवर्षा-प्रमाणे पंढरपूर येथे गेलो. गु. मामांची भेट घेतली. दिवाळीच्या रजेला जोडून ही किरकोळ रजा मिळेल असे गृहीत धरून अर्ज टाकला व तडक इकडे आलो– असे यावेळी मला यावे लागले असे त्यांना सांगितले. मामा म्हणाले, "भावे, तुमची हाडे ओंकारेश्वरी जातील. न्याय मिळणार नाही. सरळ राजीनामा देऊन मोकळे व्हा."

त्याप्रमाणे राजीनामा न देता तीस वर्षे अखंड सेवा या कलमाचा फायदा घेऊन व्हालंटरी रिटायरमेन्ट (सेवानिवृत्ती) अर्ज दिला. आळंदी येथे वारीनिमित्त जेव्हा १०–१२ दिवसांनी भेट झाली. सेवानिवृत्ती अर्ज दिला.

आपलाच शब्द, 'वारकरी एवढी पोटाची चिंता करतो' हा विषाद या वाक्यामागे जो होता, त्याची निवृत्ती केली. त्यांनी समाधान व्यक्त केले. जून १९५७ पासून मी सेवानिवृत्त आहे.

पुढे एके दिवशी मामांचे पत्र आले की तुम्ही विनोबांची भेट घ्या. त्यांचे हे पत्र मी विनोबांकडे पाठवून भेट मागितली. त्यांचेकडून उत्तर आले "अरसिकेरी, बंगलोर येथे या. आठवडाभर राहाता येईल अशा बेताने या." त्याप्रमाणे पूर्वसूचना देऊन गेलो. पूज्य विनोबांच्या सहवासात विरक्तीचे वेध लागले. घरी परतलो तेव्हा वडिलार्जित घर व रु. १३० पर्यंत सरकारसारा असणारी शेतजमीन बेदावापत्र करून

थोरल्या बंधूस (दादांना) दिली. शांतिसैनिक– संन्यासी व्हावे. बरोबर ज्ञानेश्वरी ठेवावी व भ्रमंती करीत ईश्वर चिंतनात काळ घालवावा असा निर्णय घेतला. गुरुवर्य मामांना मी हा कार्यक्रम कळविला. सौ. ने पण पत्र पाठविले. त्यांचेकडून पत्र आले, 'मी येत आहे तिथपर्यंत कोठे जाऊ नये.'

गुरुवर्य मामा त्याप्रमाणे घरी आले. भोजनोत्तर आम्ही तिघे एकत्र बसलो. गुरुवर्य मामा म्हणाले, 'माझा हेतू विनोबाजींकडे जाऊन भेट घ्या व त्यांची अनुमती तुम्ही समजावून घ्यावी हा होता. आपण सगुण मूर्ती– उपासक. आपल्या अनुभूती व विनोबा सर्व जग देवरूप– त्यांची उपासना वेगळी तर त्यांचा समन्वय तुम्हाला मिळावा हा होता.' त्यांच्या आदेशाप्रमाणे किमान एक वर्ष घर सोडावयाचे नाही, घरीच राहावयाचे असे ठरले. पुन्हा हा विचार डोकावलाच नाही हे नमूद का करावयास हवे ?

पुढे पत्नी सेवानिवृत्त झाली. तिचा फंड– विमा वगैरे रक्कम सुमारे २५ हजार रुपये हाती आले. त्यामुळे अंबरनाथ येथे "श्रीकृपा" ही वास्तू उभारण्यात आली. १० ऑगस्ट १९६० रोजी गुरुवर्य मामांच्या उपस्थितीत वास्तुशांत झाली व त्यांच्याच हस्ते नारळीचे कलम व आंब्याचे रोपटे लावून वृक्षारोपण केले. आज हे दोन वृक्ष चांगले तरारले असून आम्हास छायेची माया देत आहेत.

सन १९६१ आळंदीसही 'प्रसाद' नावाची एक छोटेखानी वास्तू विशेषतः साधनेसाठी बांधली. वास्तुशांतीही मामांच्या उपस्थितीत झाली. मामा त्यावेळी थट्टेने म्हणाले, 'काय भावे, येथे व्यापार करणार काय ? म्हणजे भाड्याने वगैरे देणार काय ?' मी म्हणालो, 'तसे नाही. पण माझे येथे राहाणे वर्षातून महिरा–पंधरा दिवस होणार. इतर वेळी घर बंद कसे ठेवायचे ?' मामा म्हणाले, 'असे करा– तुमच्या घराची किल्ली वारकरी शिक्षण संस्थेकडेच द्या. विद्यार्थी येथे अभ्यास करीत राहतील.'

याप्रमाणे आज 'प्रसाद' वास्तूचा उपयोग होत आहे.

मला ६१ वे वर्ष लागले होते. गुरुवर्य मामा या प्रसंगी

आशीर्वादाला लाभावेत अशी उत्कट इच्छा होती. कार्तिकी वारीत मी त्यांच्याजवळ बोलून दाखविली व म्हणालो, ' समारंभ धार्मिक होईल, आपला आशीर्वाद लाभावा व प्रवचन व्हावे, आपल्या सोयीचा दिवस द्यावा, मात्र तो रविवार असावा. "

रविवार दि. २६ डिसेंबर १९६५ रोजी सकाळी मामा आले व समारंभ पार पाहून सायंकाळी मुंबईस गेले. यावेळेपासून मात्र त्यांना असे वाटू लागलें की, मी आता भोगसुखाचे पाठीमागे लागलो. त्यांचा हा समज मी दूर करू शकलो नाही. त्यांची पत्रे निष्ठूर असत. कान-उघाडणी करणारी असत. त्यामुळे जिवाला हुरहूर लागली. काय करावे की ज्यायोगे मामांचा हा समज निवृत्त होईल.

मामांच्या शेवटच्या आजारात त्यांची भेट होऊ शकली नाही. सुवासिक फुलांचे एक बटण तयार करवून मीं ते त्यांचें पुतणे बापूसाहेब दांडेकर यांचेकरवी त्यांना अर्पण करावे व दर्शन (दुरून) घेऊन माघारी फिरलो. आळंदीस आलो.

आळंदीला मामांनी आमचे घरी मुक्काम असताना वरचेवर यावे अशी साहजिकच इच्छा असे. मामा घरावरून जेव्हा जाण्याचा समय येई त्यावेळी हाक मारीत. त्यांनी हाक मारली की मी लगेच कॉफी ठेवावयास सांगत असे. मामांची अपरिग्रह वृत्ती मला ठाऊक होती. तरीपण एकदा त्यांना काश्मीरी शाल देण्याचे मनात आले.

आम्हीं उभयता ती शाल घेऊन, वारकरी शिक्षण संस्थेमध्ये गेलो. त्यावेळी ते म्हणाले,

" भावे, मजकडे दोन-चार शाली नुसत्या पडून आहेत. गोपूनानांना एक दिली, पण आणलीच आहात तर आणा तुमची. "

असे म्हणून शाल त्यांनी हाती घेतली व प्रसाद म्हणून आम्हास परत दिली, माझ्या कपाटात ती प्रसाद-शाल अजून जपून ठेवली आहे.

आठवणवजा या घटना. मुख्य मुख्य त्या कथन केल्या. काय लिहू ? मामांनी माझ्या जीवाचे सार्थक सफल केलें.

संसार सफल केला. पांडुरंग दर्शन घडवून आणले.

अत्यंत कृतज्ञ. त्यांचेच लेणे त्यांच्या चरणी अर्पण.

# प रि शि ष्ट

## पुरुषोत्तम योग
### व्याख्याने

प्रस्तुत विषयाची मांडणी पुणे विद्यापीठातर्फे जी बहि:शाल शिक्षणमाला आयोजित केली जाते, तीसाठी मी केली आहे. संत ज्ञानेश्वर यांचे जीवन आणि वाङ्मय हा या मांडणीचा एकूण मूलाधार आहे. बहि:शाल शिक्षण मंडळाकडे ही व्याख्याने पाठविण्यापूर्वी प्रथम गुरुवर्य मामा आणि पूज्य विनोबाजी यांच्या अवलोकनार्थ ती पाठविली व त्यांचा आशीर्वाद घेतला.

गुरुवर्य मामांचे या विषयीचे पत्र संग्रही नाही. पण त्यांनी लिहिले ते आठवते.

" तयारी चांगल्यापैकी आहे. पण ज्याच्या त्याच्या बुद्धीचा हा प्रश्न आहे. एक साधनामार्ग या दृष्टीने पाहा. हाच एकमेव मार्ग, असा आग्रह नसावा "

पूज्य विनोबांचे पत्र जसेच्या तसे पुढे देत आहे.

**C/o Sarania Ashram**
**Gauhatti (Asam)**
**20-5-61**

श्री. भावे,

पत्र मिळाले "तुमच्या व्याख्यानांचा जो आराखडा तुम्ही बनविला आहे त्यात ज्ञानदेव-चिंतनिका थोडक्यात चांगल्या रीतीने मांडली आहे. मला आशा आहे की अशी व्याख्याने देण्याने तुमची भक्ती अधिक दृढ होईल. कुणाला उपदेश देण्याला म्हणून व्याख्याने

नाहीतच. आपला स्वत:चा विचार दृढ करण्यासाठी जपासारखी ती समजावी. तुमचे अध्ययन चालू राखावे.

**" अरे मी पाहीलेची पाहावे । विवरलेंची मागुती वीवरावे ।**
**वाचीलेंची वाचावे । पुन्हा पुन्हा ।**

विनोबा का
जय जगत्

तेव्हा गुरुवर्य मामांच्या मार्गदर्शनाने व कृपाप्रसादाने अभ्यास, वाचन, मनन करून हा अभ्यासक्रमवजा विषय तयार केला.

**१) साधना-साधक**

सर्व जग एका ब्रह्मापासून उत्पन्न होते. त्याच्याच जोरावर चालते. शेवटी लीन होते. सर्व विश्व भद्र आहे. कारण त्याचे रक्षण करणारे देव आहेत. मनुष्य जन्माला येतो- तो सष्टी, समाज व शरीर या संस्थांद्वारा जन्माला येतो (येत असतो). मनुष्य स्वत: देह-बुद्धीने बांधून घेतो. त्यातून तरून जाण्याकरिता प्रभुचिंतनाची आवश्यकता आहे. तर ईश्वर हा कसा, व त्याचे दर्शन मिळविण्याचे मार्ग प्रचलित कोणते ? तर ते तीन प्रकारचे आहेत. १) अव्यक्तोपासना- ध्यान मार्ग, २) भक्तिमार्ग- वैष्णव संप्रदाय, ३) ज्ञानमार्ग-सांख्य व वेदांत. पण मी स्वत: वैष्णव असल्याने युगे गेली परी उभा विटे असे समचरण विटेवरी उभे प्रभू पांडुरंग मानीत आहे. त्यांच्या स्फूर्तिदायक शांतीने माझ्यातील डोळस श्रद्धेला जागृत केले आहे आणि जी काही साधना झाली त्याचाच आविष्कार म्हणून हा विषय घेत आहे.

ज्ञानबीजरूप नरदेह- नेणतेपणाने स्वत:ला बांधून घेतो- इंद्रियाचे नादी लागून दीनवाणा- कामक्रोधलोभ यांचे आश्रयाल संसाराकरिता धडपड- चित्तशुद्धपूर्वक आचरणाची कास- मन एकाग्र- ईश्वराचा शोध हृदयस्थ ईश्वर- सद्गुरु शोध- वाणी हेच देवाचे द्वार- रामकृष्ण हरिजप- संत भेट- मानसिक अर्थाने निजपद प्राप्ती- सर्वांभूती देहसिद्ध.

मनुष्यदेह पूर्वपुण्याईनेच लाभत असतो. त्यात ईश्वरी अंश लोपलेला असतो- तो ज्ञानबीजरूप असतो- त्याला प्रयत्न केल्यास

ओळख करून घेणे शक्य असते– पण तो अज्ञानाने देह मी– पुत्रादिक माझे, अशी कल्पना करून शुकनलिका न्यायाने स्वतःस बांधून घेतो. काम-क्रोध-लोभ यांच्यात गुरफटून घेतो. अर्थलोभ तर इतका परमावधीचा असतो की कामात काम वाढवून घेऊन कधीही हिताची धडपड सुटत नसते. इंद्रिये देवाने दिली. पण त्यांना दोन्ही प्रवृत्ती दिल्या. त्यांचेवर सुगंधाचा परिणाम जसा होतो तसाच दुर्गंधाचाही होतो. पापपुण्यात्मक क्रिया घडतात. पण आपल्या हातून त्यांच्या नादी लागल्याने पापात्मक फलिते ज्यांची जास्त– वासनाक्षय तर नाहीच तर वृद्धी जास्त अशा तऱ्हेची कामे होतात. त्यामुळे आपली गत काय हे विचारण्याची पाळी येते. मदालसा पुत्राला उपदेश करते– 'जन्ममरण चुकव– सद्‌गुरूला शरण जा– संसाराकरिता धडपड करू नकोस. तुला वाटत असेल की कामक्रोधलोभ या त्रिकुटासह मी परमार्थात शिरेन. पण तो वेडेपणा आहे. तर चित्त जेणे करून शुद्ध होईल असे आचरण कर. मन एकाग्र करण्याचा यत्न कर. संतभेट घे. त्यांना जीवनाची कला साधलेली असते. त्यांच्या हृदयात ईश्वराचे सतत चिंतन असल्याने शांती आणि क्षमा त्यांना साथ देत असतात. ईश्वराचा शोध घेण्याकरिता पुढे पुढे जावे– तीर्थयात्रा कराव्या, पण शेवटी कळून येते की तो तर आपल्या हृदयात आहे. आता बाहेरच्या शोधात पडू नकोस. चित्ताचा विकास कर. चिंतन कर. वाणी हे देवाचे द्वार आहे. 'रामकृष्ण हरि' हा नाममंत्र जप– मनाला सृष्टीत हिंडून द्यावे पण आपण साक्षी रूपाने अलग होण्याचा यत्न करावा.

रामकृष्ण नाम प्रीतीने, भक्तीने गा. तें पतिताला पावन करणारे आहे. क्षणभरही रिकामा राहू नकोस. इंद्रियाचे लाड करू नकोस. निग्रहाने वाग. संपत्ती, शरीर फार काय, काळसुद्धा जाणार आहे. नाम जाणार नाही. संसाराला भलते महत्त्व देऊ नकोस–वृत्तीसकट अहंकार लोपू दे. मला केवळ तुझ्या नामाची समाधी लाभू दे. दया, क्षमा, शान्ती यांचा विसर न पडू दे. सर्वांघटी प्रभू दिसेल असे होऊं दे. जसजशी भूतदया व्यापक होईल तसतसे इतर जीवांपासून अंतर तुटत जाते–सर्वांचे सुख ते माझे सुख. परस्परांत गाढ स्नेह, नम्रता आणि स्वतःला शून्य बन-विण्याची वृत्ती अंगी येतें व निजपद रूप प्राप्त होतें.

## २) भक्ती

विठ्ठलाचे दर्शन सुख–सर्व सुखाचे आगर–स्वरूप वर्णन–शब्दच अपुरे–ईश्वर एक–उपासक बहुविध–एकदेशीय मूर्ती–मध्ये सर्वव्यापक निर्लिप्त परमेश्वर भाव–दर्शन–सगुण निर्गुण ईश्वरच–एकमेव मनोमंदिर विठ्ठल मूर्ती–भक्ती सगुणात–निर्गुण प्रकट–सेवक स्वामी–पण सेवकच राहणारा मुद्रांकित–तुझा वियोग-तीव्र वियोग दु:ख–पंढरीचे राणें पाहाण्यास वेडापीसा– गोविंदाचा ध्यास– मनोभावे सेवा– सर्व सुकृताचे फळ.

पांडुरंग मूर्तीचे ध्यान–त्याच्या दर्शनाने आनंद–सर्व सुखरूप परमात्मा–त्या स्वरूपाचे वर्णन–शब्दच अपुरे आहेत. निर्गुणाचे वर्णन अरूप शब्दाने करता तरी येईल. पण त्याच्याशी बोलता, पाया पडता कसे येणार याचा उलगडा झाला. रूप हृदयात स्वयंभू व त्याचाच पडताळा मूर्तीरूप. ईश्वर अव्यक्त–अवतार स्वरूप आहे. पण चित्रकार काल्पनिक संकेत रचून ईश्वराचे चित्र वा प्रतिमा बनवितो. पण भक्त मात्र त्या मूर्तीमध्ये सर्वव्यापक निर्लेप परमेश्वराचे भावन करतो. ईश्वराचे स्वरूप काय, त्याचा मायेशी संबंध कोणत्या प्रकारचा वगैरेंचा निर्णय म्हणजे आकाशाला गवसणी घालण्यासारख्या आहेत. आनंद आणि प्रबोध या तर त्याच्या दोन मोठया खुणा आहेत. पण विटेवर उभा ही आम्हा भक्तांची खूण आहे. विश्वरूपानें नटलेला सत्यस्वरूप आत्माराम तूच आहेस. म्हणून आता तर्क नको. चित्तातून सर्व अवांतर ज्ञाने निपटली जाऊ देत, तेंथील सर्व जागा मनोरूपी मंदिर तुझ्या विठ्ठल मूर्तीने व्यापू दे. वाणीने विठ्ठलाचेच गुणगान होऊ दे. ईश्वरावर प्रेम केल्याशिवाय तो कसा समजला जाणार ? भक्ती एकमेव साधन होऊ दे. इतर साधने तोकडी आहेत. आतल्या आत भटकावे अशी ती आहेत. सर्वसुख साम्य अशी हरीची समाधी लागू दे. सेवकाने स्वामीच्या हृदयाचा स्वामी व्हावा अशी मनीषा असू दे. स्वामीने स्वामी म्हटले तरी सेवक-भाव न जाऊ दे. अखंड भक्त राहू दे. तान्हेल्याला पाण्याचा ध्यास तसे मला तुझें आकर्षण राहू दे. तुझी गोडी लागू दे. तुझ्या पायाखालील वीट होऊ दे. शून्य बनू दे. तुझ्या प्रेमसुखात माझी सुखे मुरतील असे तू

कर. तू माझा स्वामी व मी तुझा सेवक. तरी एकच रूप आपण एवढा अभेदाचा अनुभव मला येऊ दे. विरहणीसारखी तीव्र वियोगदु:खे जेव्हा अनुभवास येतात तेव्हा वेडापिसा होतो. माणसातून उठतो. पाखरांना म्हणतो, (विचारतो) 'पंढरीचे राणे केव्हा भेटतील हो ?' देहभावने-सकट चैतन्य जाऊन पदार्थांना त्याचा भास होतो. यातिकूळ विसरून जाते, भक्तिप्रेमाची गोडी वाढते. तू वैकुंठात राहातोस, पण आता माझ्या हृदयात राहा. तुमच्या प्रेमाशिवाय आता येथे काही नाही. आज सोनियाचा दिवस आहे. हृदयात तू प्रकटला आहेस. आता डळमळीतपणा राहिला नाही. सर्व संसार सुखाचा होऊन माझ्या देहात मी त्याला अनुभवीत आहे. सर्व सुकृताचे फळ लाभले आहे.

३) दर्शन

सर्व संतांना बरोबर घेऊन विठ्ठलाला भेट. हृदयाचे गाभाऱ्यात दर्शन. देह आत्म्याचा प्रकट करणारा दिवा–निराकार वस्तू आकारात–सारी अनुभूती विठ्ठलमय–योगिया दुर्लभ–विश्वास–कट अनंत रूप व वेषदर्शन–जग म्हणजे आपलेच रूप पाहण्याचा आरसा–जगाची दृश्यता लोपली–जगभर कृष्णमूर्ति भासली व ईश्वर स्वरूप व जग मिथ्या भास–विश्वरूप दर्शन अनुभव–अज्ञान जाऊन ज्ञान लाभ– ज्ञान स्वरूप जागृतीतील गाढ झोप–आत विठ्ठल–बाहेर विठ्ठल–स्वत: विठ्ठल–साधना संपली ईश्वराचे पायी जीवभाव समर्पण एवढेच मरण.

सकल संतांना घेऊन प्रभू भेटावयास आले. विटेवर भक्तवत्सल देवता उभी आहे. तिचे हृदयात दर्शन झाले आहे. तीच व्यापक स्वरूपात प्रकट झाली. निराकार वस्तू आकारात प्रकट झाली. सारी अनुभूती कृष्णमय झाली. कोटी कोटी चंद्राची सौम्य प्रेममय कांती तुझ्या भाल-प्रदेशांवर दिसू लागली. योगियांना दुर्लभ, विश्व सारून दूर एकांतात. ते मला विश्वासकट अनंत रूपाने व वेषाने दर्शन लाभले. जग म्हणजे आपलेंच रूप पाहण्याचा आरसा झाले. जगाची दृश्यता लोपली. प्रेमाची केवढी नवलाई हो. जगभर कृष्णमूर्ती भासू लागली. कीडा, मुंगी सर्वच तुझे रूप धरून राहिले. जीव ईश्वरस्वरूप भासू लागले. जगाचे मिथ्यत्व कळून आले. साऱ्या जगभर घनदाट हरिप्रभेचे ब्रह्मांड ढवळले. विश्वरूप

पाहू लागलो तर चारीं बाजूंना हरीचे रूप दिसू लागले. पण कालांतराने माझ्यातच त्याचे रूपांतर झाले. माझे चित्तच माझ्याने व्यापले. शरीर ज्योतिर्लिग झाले. अज्ञान गेले ज्ञान लाभले. पण ज्ञानी झालो नाही. अतिलीन ज्ञानस्वरूपी झालो. जागृतीतील गाढ झोप अवस्थेसारखा झालो. त्यास भेटावयास गेले तर मींच झालो अशी स्थिती झाली--माझ्या आत विठ्ठल, माझ्या बाहेर विठ्ठल, मीच स्वत: विठ्ठल व सर्व अनुभवणाराही मीच. साधना संपली आहे. आत्मस्वरूप विश्वाकार झाले आहे. देहभाव गळून पडले आहेत. देवाची भक्ती करणे तर तोही मार्ग खुंटला आहे. देवभक्त कृपा सारी माझ्याच ठिकाणी एकवटली आहेत. देहावर आशा राहिली नाही. उदास होण्याचे कारण नाही. जीवनात ईश्वर मुरून राहिला आहे. जगणे हे देहावर सोपवून स्वस्थ आहे. स्वरूपाचे ठिकाणी जगणेही नाही व मरणेही नाही. ईश्वराचे पायी जीवभाव समर्पण एवढे एकच मरण ज्ञानदेव जाणतात.

जगभर निवृत्तीचा धर्म जागो
ॐ तत्सत.
पुंडलिक वरदा हरि विठ्ठल.



## विवरण : विचारसरणी

जन्म आहे तिथे नाश वा क्षय आहेच. क्षय म्हणजे आत्मा शरीरातून जाणे, कलेवर मागे ठेवून जाणे. थोडक्यात आत्म्याची देहाहून भिन्नता लक्षात घेतली की अज्ञानी जीवाच्या मरणोत्तर गतीचा प्रश्न येणारच. त्याला जड सृष्टीत लीन होता येणार नाही, कारण तो चेतन आहे. त्याला ईश्वराप्रत मिसळता येत नाही. कारण आत्मज्ञान लाभलेले नाही. आणि म्हणून आत्मानात्म विचार विसृत देतो.

वृक्ष अस्तित्वात आहे तोपर्यंत त्याच्या फलांनाच उत्पत्ती स्थिती, वाढ, परिणाम, संकोच आणि नाश हे सहा विकार होतात. परंतु त्या वृक्षावर त्याचा काहीच परिणाम होत नाही, त्याप्रमाणे ते सर्व विकार देहालाच होतात. आत्म्यावर त्याचा मुळीच परिणाम होत नाही. "आत्मा हा सदासर्वकाळ निर्विकार असतो. आत्मा नित्य, निर्विकार, निर्मळ, अद्वितीय, देहसाक्षी, देहधार, क्रियाशून्य, स्वयंप्रकाशी, सर्वोत्पादक, सर्वव्यापी, अलिप्त आणि अवेष्ठित असा आहे." या बारा श्रेष्ठ लक्षणांवरून पुरुषाने देहाहून आत्मा भिन्न आहे असे ओळखून मोहामुळे उत्पन्न होणारा देहावरील दुराभिमान सोडून द्यावा. मर्मज्ञ मनुष्य मातीत सोने आहे असे ओळखतो आणि नंतर भट्टी वगैरे लावल्याने सुवर्णाची प्राप्ती होते. त्याप्रमाणेच अध्यात्मज्ञानी मनुष्याला देहरूप क्षेत्रात आत्मप्रतीती होते व त्याला आत्मप्राप्तीच्या उपायांनी आत्मलाभ म्हणजे मोक्ष प्राप्त होतो. प्रकृती; महतत्त्व, अहंकार, शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या आठ प्रकृती, सत्त्व, रज, तम हे प्रकृतींचे तीन गुण; कर्ण, त्वचा, नेत्र, जिव्हा, नासिका, वायु, उपस्थ, हस्त, पाद, वाणी व मन ही अकरा इंद्रिये आणि पृथ्व्यादिक पंचमहाभूते मिळून जे षोडष विकार आहेत व ह्या सर्वांचे

ठिकाणी व्यापून राहाणारा आत्मा हा एकच आहे असे महान प्राचीन ऋषींनी म्हटले आहे. देह हा प्रकृत्यादी गुणांचा समुदाय असून त्यात स्थावर व जंगम असे दोन भेद आहेत. यांतच वेदानी 'नेति नेति' म्हणून वर्णिलेला आत्मा वास करीत असतो. ह्यास्तव आत्म्याचा अन्वयव–व्यतिरेक यांच्या योगाने शोध करावा. जसे मण्यांच्या माळेत गोविलेले सूत एकच असते व तें सर्व मण्यांना व्यापून असते तसाच आत्मा एकच असून सर्वांना व्यापून असतो हा आत्म्याचा अन्वय आणि सूत जसे मण्यात असूनही त्यापासून भिन्न असते तसा आत्मा हा सर्व पदार्थांत असूनही निराळा हा व्यतिरेक. ह्या अन्वय व्यतिरेकाचा विचार केल्याने मन शुद्ध होते. अशा प्रकारे मन शुद्ध झाले म्हणजे ज्या पासून उत्पत्ती, स्थिती आणि लय होतात व जो त्या कार्यापासून अलिप्त असतो त्या आत्म्याचा एकाग्रपणे शोध करावा.

## आत्म्याचे स्वरूप

बुद्धीच्या प्रवृत्ती म्हणजे जागृती, स्वप्न व सुषुप्ती या होत. या अवस्थांचे ज्ञान ज्यामुळे कळते तोच सर्वसाक्षी आत्मा होय. फुलावरून वाहात असलेला वारा जरी गंधवान असला तरी तो ज्याप्रमाणे फूल नव्हे, त्याचप्रमाणे जागृती, स्वप्न व सुषुप्ती ह्या तीन जरी आत्म्याच्या योगाने उपलब्ध झाल्या तरी तो आत्मा ह्या तीन वृत्ती नव्हे, तो सर्वाहून अगदी निराळा आहे. बुद्धी ही संसाराला मूळ कारण आहे. वस्तुतः अज्ञानमूलक आणि मिथ्या असणारा हा संसार गुणकर्मांच्या योगाने पुरुषाला स्वप्नाप्रमाणे भोगावा लागतो. हे अज्ञान नाहीसे व्हावे, जागृती आदी बुद्धीचे प्रवाह बंद व्हावे, याकरिता गुरूची सेवा व साधूंची भक्ती करावी. हा विचार फक्त नरदेहातच शक्य आहे. तेव्हा महत्त्वपूर्ण देह असताना ज्याप्रमाणे ज्ञानेश्वर माउलीने आपल्या देहाचे सार्थक केले, जिवंत समाधी घेतली, त्या माउली ज्ञानी कशा झाल्या याचा विचार पुढील व्याख्यानात येणारच आहे. आज ज्ञानी मनुष्य जन्म पावत नाही आणि मृत्यूही पावत नाही. कारण आत्मा कोठून आलेला नाही अथवा स्वतःहून भिन्न असा कोणी नाही. हा जन्मरहित, नित्य, क्षयरहित व वृद्धिरहित आहे. ही बुद्धी माउलींचे ठिकाणी होती.

## भक्ती

माउली जीवनमुक्त ज्ञानी होते. मिथ्या म्हणजे खोटेपणा नाहीच असे नाही. पण खरे ते खोटे असेही नाही. देह मी तरच रागादिक भावना संभवतात. पण देह म्हणजे मी असे न मानणारा याला संभवत नाही.

देव निर्गुण-पण वर्फ-पाण्याचा याचा अर्थ बर्फ म्हणजे पाणी नव्हे. पण बर्फात पाण्याशिवाय जसे काही नसते तसेच सगुण रूप विठ्ठल देवाचे भावन करावयाचे असतें व त्याचेद्वारा भक्ती–उपासना करून देहाच्या सहज प्रवृत्ती-वासना-अहंकार, असत्य आणि अज्ञान या शुद्ध करावयाच्या असतात. तेव्हा प्रथम देवाचे ध्यान, जप इत्यादी साधनांना आरंभ करावा लागतो तो याकरिता. प्राथमिक अवस्थेत जो आत्मा असतो तो सुखाचे (देहाला) पाठीमागे असलेल्याने जे कर्म होत असतें ते विषयात्मा या स्वरूपाचे असते. तर आपण काही तरी यातून निवृत्तीकरिता तरी केले पाहिजे ही जी मनाची धारणा म्हणा, प्रेरणा म्हणा, आतला आवाज म्हणा यानी " भक्ती " साधनेची बैठक–पाया–सुरु झाला असे समजावे. हे सुरू झालेले रूपांतर घोटाळ्यात अडकले जाऊ नये म्हणून मनाला आवर वा बांध घालावा लागतो. कारण देहाचे अवयव कार्य प्रवण–मनोवृत्ती करवीत असतात. तेव्हा मनोमय–उपासना–म्हणजेच " धारणा " या पुढील टप्प्यावर साधक प्रवेश करीत असतो. श्रवण वा वाचन मनन याद्वारे विचारांचे भूमिकेवर आत्मसात करावयाचे–पचन करावयाचे–हे ध्येय यावेळी असावे लागते व त्यांचा पाठपुरावा होणेकरिता जे विक्षेप होतात त्यांचेशी मुकाबला करावयाचा असतो. याकरिता छंद वा ध्यास लागला आहे असे होणेस हवे असतें. क्रिया जरी हळूहळूच होत राहातात याकरिता आवृत्ती–प्रयत्नशीलता (काही वेळेला कर्मठपणा म्हणाना यात क्रिया चालू असते, पण मन मात्र साथ देत नसते). यात खंडितपणा येता कामा नये–खंडितपण तर चिंता वाटावयास हवी–सिद्धी हे त्याचे स्वभावतःच फल असल्याने–ते घडणारेच असते नव्हे घडणारच ही श्रद्धा पाहिजे. काळवेळ लागेल इतकेच. तेव्हा हा निदिध्यास ज्ञानमय असावा. निश्चित स्वरूप–अहंकारादी

विकारांवर ताबा–त्याची समूळ निवृत्ती करणेंची आहे. हे साध्य आहे याकरिता निदिध्यास असावा लागतो. ज्याचे फल म्हणजेच ज्या सिद्धीची अपेक्षा– की आत्म्याला आत्म्याने पाहाणे वा जाणून घेणे ते घडत असतें. ध्यानमूर्ती विटेवरी उभे पंढरीचे राणे आपल्या हृदयात ध्यानमग्न असतांना अवतरित झालेले असतात. भास नव्हे–अनुभूतीने– आनंद–आनंद-साफल्य इत्यादी भावना उत्स्फूर्त प्रकट झालेल्या असतात. आत्मा विसावलेला, शान्त झालेला असतो. अनर्थाचे समूळ उच्चाटन होते. महात्मा शान्त – आत्मा या अवस्थेप्रत साधक भक्तीच्या आधाराने होतो. संसार (देह) सफल झाला. पंढरीच्या पांडुरंगाच्या पायाचे दर्शन झालेले असते. अशा तऱ्हेच्या कर्तव्यतृप्तीच्या भावना उचंबळत असतात.

## दर्शन

यात विशेष असे लिहावयाचे तर साक्षात्कार वा दर्शन झालेला लाभ निरंतर राहावा, त्याला विसंबू नये असे वेळोवेळी व्हावा हा प्रयत्न असला पाहिजे, कारण विषयनिवृत्ती ही नाश पावलेली असते. पुत्र, वित्त, स्नेहपाश तुटलेले असतात. देवत्व असावे इतकी एकरूपता आलेली असते. ओतप्रोत विश्वप्रेम भरलेंले असते. विषयत्याग झालेला असून भोगाचे ठिकाणी वृत्ती पुन्हां उदित होत असते. देह वैराग्यभावना होते. त्यांच्या ज्या क्रिया चालू राहातात त्या वासनारहित असतात. सहज स्वभाव धर्म देहाचा म्हणून चालू. राहिलेल्या असतात–प्रकटच–तर–माउलींनीं

जीवन समाधी घेतलीच नाही का ?

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

पुंडलिक वरदा हरि विठ्ठल.

टीप :

गुरुदेव (मामा) सोनोपंत यांच्यातील करुणेने त्यांनी मला आपलेसे केलें आणि सेवा व्हावी – नाहीतर "देव करी तरी काय न होई" अशी काहीतरी ज़ादू मामांनीं केली, पावन केले. त्यांचा वरप्रसाद संक्षिप्तपणे का होईना, पण साधकाला (वाचकाला) सेवन करता यावा या हेतूने हे परिशिष्ट दिले आहे.

# आमची धार्मिक प्रकाशने

* कारंजमहात्म्य
* श्रीगणेश पत्री
* श्री गायत्री मंत्र व त्याचे महत्व
* श्रीमद्‌भगवद्‌गीता (पदच्छेदासह)
* श्रीनृसिंहसरस्वती स्वामी (अवतार वृत्तांत व सगुणोपासना)
* श्री गंगालहरी स्तोत्र
* करवीरनिवासिनी श्री महालक्ष्मी अंबाबाई
* आदिशक्ती श्री सप्तश्रृंगनिवासिनी

卐 श्री गुरुलिलामृत
卐 श्री गजानन महाराज कथासार
卐 श्री शनिमहात्म्य, कथासार व उपासना
卐 श्री श्रद्धेची अंजली
● श्री स्वामी समर्थ (अक्कलकोट स्वामी बखर, चिपळूण मठ)
卐 अथ ऋग्वेदीय नित्यविधी:
卐 श्रीगुरुचरित्र (सुट्टी पोथी व रेशमी बाइंडींग)
卐 श्री अक्कलकोट स्वामी समर्थ मठ, पुणे (वृत्तांत व सगुणोपासना)
卐 श्रीमद्‌भगवद्‌गीता अ. १ ते ५, ६ ते ११, १६ व १७, १२ व १५
● अथ ऋग्वेदीय ब्रह्मकर्म समुच्चयः
卐 श्री दत्तंभट महाराज चरित्र
卐 प्रतिवार्षिक पूजाकथासंग्रह
卐 अथ हिरण्यकेशीयो नित्यविधी:
卐 अथ ऋग्वेद दशग्रंथ

* श्री दत्तसहस्त्रनाम स्तोत्र
* नित्योपयोगी एकवीस स्तोत्रे
* श्री सप्तशती अध्याय ११ वा
* श्री अष्टविनायक यात्रा
* नित्योपयोगी आरत्या व गणेशपूजा
* श्रीराम नामावली
* दुर्गाकवचम्
* श्री दत्त स्तोत्रे

**अनमोल प्रकाशन,**
अप्पा बळवंत चौक, पुणे २.